देवालय बांधण्यास ही जागा अनिलवाडा येथील बनुलशहा या जैन लक्षाधीशानें खरेदी केली. देवळासमोर देवालय स्थापन करणाऱ्याचा घोड्यावर स्वार असलेला पुतळा आहे. नेमिनाचें दुसरें देवालय आहे. तेथील शिलालेखांत तें तेराव्या शतकांत बांधल्याविषयीं उल्लेख आहे. जवळच सुंदर आणि लहानसें सरोवर आहे. त्या पहाडावर दरवर्षी एकंदर ६० इंच पाऊस पडतो. अबूरोड हें बी. बी. सी. आय् रेलवेचें स्टेशन मुंबईहून ४२९ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ९ आणे पडतें.

## अहमदाबाद.

बी. बी. सी. आय, जी. आय. पी. व राजपुताना माळवा रेलवेचें हें जंक्शन असून मुंबई इलाख्यांतील एका जिल्ह्याचें ठिकाण आहे. गुजराथेंतील प्रमुख शहरांपैकीं हें एक असून मुंबई इलाख्यांतील एक नमुनेदार व कारागिरीचें शहर आहे. शहरांत व आसपास पुष्कळ मशिदी व जुनीं थडगीं आहेत. त्यांत जुम्मा मशीद म्हणून जी आहे ती हिंदुस्थानांतील एक प्रेक्षणीय व अतिशय सुंदर अशी आहे. राणी सिप्रीची मशीद तर जगांतील एक अनुपमेय इमारत आहे. हिला अहमदाबादचें एक रत्न असें म्हणतात. ही इमारत गुजराथचा राजा सुलतान महमद बेगद याच्या पत्नीनें बांधिली आहे. हैबतखानची मशीद म्हणजे हिंदु व मुसलमान शिल्पकामाचें एक मिश्र प्रदर्शनच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. शहराबाहेर दादाहरीरची विहीर, शाहीबाग, शहा आलम, सरखित वगैरे ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. सरखिज येथील कृत्रिम सरोवर फारच मनोहर आहे. येथें जैन देवालयें सुमारें १२० वर आहेत. कमींत कमी दरवर्षास २४ जत्रा या ठिकाणीं भरतात. अहमदाबाद मुंबईहून ३१० मैल आहे. रेलवे भाडें ३ रु. ६ आणे. ( तिसरा वर्ग. )

## अहमदनगर.

हें मुंबई इलाख्यांतील एक लष्करी ठिकाण आहे. भर उन्हाळ्यांत अतिशय थंड असें एक ठिकाण ( एक दरी ) येथून १४ मैलावर आहे त्यास इंग्रज लोक Happy valley असें म्हणतात. शहर स्टेशनाहून ३ मैल आहे. नगरास व जवळपास पाहण्यासारखीं अनेक ठिकाणें आहेत. मुसलमानी कारकीर्दींत बांधलेला किल्ला मजबूत असून त्याची जोपासना चांगली

आहे. नगरपासून सहा मैलावर एका टेंकडीवर सलाबतखानाची एक कबर आहे. अहमदनगर हें मुसलमान राजांचें एक राजधानीचें शहर होतें. हें जिल्ह्याचें ठिकाण असून येथें युरोपियन व नेटीव पायदळ पलटणी आहेत. शहरांत प्रवाशांकरितां दोन धर्मशाळा आहेत, स्टेशनावर नेहमीं तांगे मिळतात, अहमदनगर हें मुंबईहून जी. आय. पी. रेलवेनें मनमाडमार्गें २९७मैल व दौंडवरून २१८ मैल आहे. रेलवेनें तिसऱ्या वर्गाचें भाडें अनुक्रमें २ रु. १० आणे व २ रु. ९ आणे आहे.

## अजिंठा.

अजिंठ्याचीं लेणीं सुप्रसिद्ध आहेत. हें ठिकाण जी. आय. पी. रेलवेच्या जळगांव स्टेशनहून ३८ मैलांवर निजामाचे राज्यांत आहे. गांवापासून लेणीं सुमारें ४ मैल आहेत. या लेण्यांत बुद्धांचे २४ विहार असून खेरीज ५ देवालयें आहेत. हीं सर्व खडकांत कोरलेलीं असून त्यांचें खोदीव काम असामान्य आहे. या लेण्यांचा अप्रतिमपणा पुष्कळ इंग्रज लेखकांनीं वर्णिलेला आहे. सर्वांत जुनीं असलेलीं लेणीं इ. स. पूर्वीं सुमारें २००वर्षांचीं असावींत. जळगांव स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. जळगांव मुंबईहून २६१ मैल असून रेलवेभाडें २ रु. १२ आणे लागतें.

## अजमीर.

हा राजपुतान्यांतील जिल्ह्याचा गांव असून राजपुताना माळवा रेलवेचें मुख्य ठिकाण आहे. हें शहर फार प्राचीन असून इतिहासप्रसिद्ध आहे. दंतकथेवरून पहातां हें शहर अजराजानें इ. स. १४५ चे सुमारास वसविलें असल्याविषयीं माहिती लागते. हें एका दरींत वसलेलें असून सभोंवतालच्या टेंकड्यांचा वगैरे देखावा फारच बहारीचा आहे. शहराभोंवतीं तट असून आंत जाण्यास अतीशय उंच व मजबूत असे पांच दरवाजे आहेत. शहराच्या पश्चिमेस सुंदर कृत्रिम सरोवर आहे. त्याला अनसागर असें म्हणतात. पावसाळ्यांत या तलावाचा एकंदर घेर सरासरी ६ मैलावर असतो. येथें पाहण्यासारखीं म्हणून जीं ठिकाणें आहेत त्यांत खाज्रा साहेबाचा दर्गा ही एक हिंदु व मुसलमानांस सारखीच पवित्र अशी जागा आहे. या साधूनें आपल्या हयातींत अनेक चमत्कार व अद्भुत गोष्टी घडवून आणल्या असें सांगतात. येथील उरूस आगष्ट

महिन्यांत भरतो. २०००० वर लोक जमतात. "अधइद्दीन को झोपडी" दौलतबाग व राजपुतान्यांतील राजकुमारांप्रीत्यर्थ असलेल्या मेयो कॉलेजची भव्य इमारत वगैरे दुसरीं ठिकाणेंही प्रेक्षणीय आहेत. पुष्कर हें अति पवित्र स्थान अजमीरच्या नैऋत्येस ७ मैलांवर आहे. नोव्हेंबर मध्यें यात्रा मोठी भरते. यात्रेंत घोडे व तट्टें यांचा बाजार फार मोठा भरतो. पुष्कर तीर्थावर स्नान करण्यास हजारों लोक येतात. अजमीर व मुंबई यांमधील अंतर ६१९ मैल आहे. रेलवे आकार ६ रु. ४ आणे लागतो, स्टेशनवर ( हिंदूंची ) खाणावळ आहे. तांगे वगैरे मिळतात.

## अलाहाबाद अथवा प्रयाग.

हें आर्यांचें अतिपुरातन क्षेत्र गंगा, यमुना व सरस्वती यांच्या संगमावर आहे. संगम स्टेशनहून ४ मैलांवर आहे. संगमावरच किल्ला आहे. हा अकबर बादशहानें इ. स. १५७५ मध्यें बांधला आहे. किल्ल्यांत बौद्ध राजा अशोक यानें इ. स. पूर्वी २४० वे वर्षीं उभारलेला एक दगडी खांब आहे. त्याची उंची ३० फूट आहे. त्यावर अनेक लेख कोरलेले आहेत. सरस्वती ही नदी अंतरवाहिनी आहे अशी समजूत आहे. संगमाचा असा कांहीं चमत्कार आहे कीं, किल्ल्याच्या कोपऱ्याशीं ज्या ठिकाणीं दोन्हींचा मिलाफ होतो, त्या ठिकाणीं एकाद्या आखलेल्या रेघेप्रमाणें रेघ दिसत असून यमुनेचें पाणी हिरवें व भागीरथीचें पाणी पांढरें अगदीं स्वच्छ दिसतें. हाच या ठिकाणचा विशेष चमत्कार आहे. सक्षौर सचैल स्नान कोणत्याही तीर्थावर अवश्यच आहे पण सौभाग्यवती स्त्रियांस या ठिकाणीं वेणीदान द्यावें लागतें. हा समारंभ या ठिकाणीं फारच थाटाचा होतो व तो पुण्यप्रदही समजला जातो. गंगेचें विस्तीर्ण पात्र शुभ्र जलौघ व आसमंतांतली रम्य वनश्री व एकंदर देखावा अवलोकन केल्यावर सृष्टीदेवतेचें मनोहर स्वरूप डोळ्यांसमोर उभें रहातें. संगमावरच किल्ल्याचें दार आहे. आंत एका ठिकाणीं जमीनींत गुहा असल्यासारखी असून तींत अनेक ऋषींच्या व तपस्व्यांच्या भव्य व प्रचंड अशा पाषाणमूर्ती आहेत, अक्षय वट या ठिकाणींच आहे. अक्षय वटाविषयींची आख्यायिका अशी आहे कीं, बुंधा प्रयागास, शाखा काशीस व पल्लव गयेस आहेत. त्याप्रमाणें येथें फक्त बुंधा आहे. वर अदृश्य आहे. माघमेळा म्हणून मोठी यात्रा दरसाल पौष

महिन्यांत भरते. दोन तीन लाख लोक जमतात. अलाहाबाद हें ई. आय. रेल्वेचें स्टेशन आहे. स्टेशनचे बाहेर बिहारीलाल कुंजीलाल यांनीं बांधलेली धर्मशाळा आहे. अलाहाबाद कलकत्याहून ५१४ मैल आणि मुंबईहून ८४४ मैल आहे. रेल्वे चार्ज अनुक्रमें ५ रु. १ आ. व ९ रु. १ आणा आहे.

## अलवार.

हें राजपुतान्यांतील एक संस्थान आहे व आर. एम्. आरचें स्टेशन आहे. मुंबईहून ७९२ मैल व दिल्लीहून ९८ मैल आहे. शहराभोंवतालचा कोट मजबूत असून त्याची उंची १२०० फूट आहे. सभोंवतीं बागबगीचे वगैरे वृक्षसमुदाय असल्यामुळें शहरास एक प्रकारची शोभा आलेली आहे. बनविलास राजवाडा, अति मोलवान् असा हस्तलिखित ग्रंथसंग्रह असलेली लायब्ररी, महाराज सवाई जयसिंग बहादूर यांचे टेंकडीवरील महाल, नूरशहाजीची कबर, कंपनीबाग, फत्तेजंगचा घुमट व जगन्नाथाचें व जैनांचीं देवालयें वगैरे ठिकाणें बघण्यासारखीं आहेत. स्टेशनवर फक्त एक्के मिळतात. गाड्यांना दरबारची परवानगी नांहीं. मुंबईपासून रेल्वेनें तिसऱ्या वर्गाचें भाडें ७ रु. १० आणे लागतें.

## अमरकंटक.

हा पर्वत मध्यप्रांतांतील रेवा संस्थानांत आहे. नर्मदेचा उगम याच ठिकाणीं आहे. समुद्राच्या सपाटीपासून या पर्वताची उंची ३४९३ फूट आहे. अमरकंटक ही मेघदूत आणि अमरकंटक या सुप्रसिद्ध काव्यांचा कर्ता कविकुलगुरु कालिदास याची जन्मभूमी आहे. महाशिवरात्रीला मोठी यात्रा असते. ग्रहणाचे वेळींही स्नानास हजारों लोक येतात. पर्वतावर पांच कुंडें आहेत. येथेंच नर्मदा उगम पावली असल्यामुळें हें स्थान फारच रम्य व पवित्र आहे. या ठिकाणास बेंगाल नागपूरच्या पेंद्रारोड स्टेशनवरून जावें लागतें. बैलगाड्या व तट्टें मिळतात. गाड्यांतून पायथ्यापर्यंत नंतर घोड्यावर व डोलींतून टेंकडीवर जावें लागतें. यात्रेकरूंना धर्मशाळा आहे. पेंद्रारोड हें स्टेशन कलकत्त्याहून ५०८ मैल आहे. रेल्वे चार्ज ५ रु. ७ आ. ९ पै.

## अमरनाथ. ( काश्मीर )

हें काश्मीर संस्थानांतील एक पवित्र स्थान आहे. कलकत्याहून रेलवेनें रावळपिंडी १३९३ मैल आहे. तेथून श्रीनगरास टांग्यानें जावें लागतें. श्रीनगर कश्मीर संस्थानचें राजधानीचें शहर आहे. श्रीनगराहून अमरनाथ जवळच दहा पांच पावलांवर आहे. कलकत्याहून रावळपिंडीस रेलवेनें १४ रु. १ आणा लागतो. अमरनाथ हें महादेवाचें स्थान आहे. देवालयाच्या कोनाड्यांत वगैरे खबुतरें आहेत. यात्रेकरूंच्या प्रार्थनेच्या आवाजानें तें उडून गेल्यास देवाचा प्रसाद झाला असें समजतात. रावळपिंडीहून श्रीनरास चांगला रस्ता म्हणजे मेरी आणि जेलम दरी मार्गें होय. रावळपिंडीहून श्रीनगरास जाण्यास बैलगाडीचें भाडें २२ रुपये पडतें.

## अंबरनाथ.

या नांवाचा एक लहानसा गांव मुंबईजवळ कल्याण जिल्ह्यांत आहे व हें जी. आय. पीचें स्टेशनही आहे. गांवाजवळ पूर्वेच्या बाजूस महादेवाचें देवालय आहे. या देवालयाचें काम आर्यांच्या शिल्पकामाचा एक अस्सल नमुनाच आहे. ह्यावर असलेल्या लेखांत शके ९८२ असा उल्लेख आढळतो. यावरून हें देवालय अकराव्या शतकांत बांधलें असावें. येथील सभामंडप चौरसचौरस २२ फूट ९ इंच आहे. मंडपाला चार खांब असून त्यावरील खोदीव काम फारच सुंदर आहे. येथील मुख्य खोदीव काम म्हणजे महादेव व पार्वती यांच्या मूर्ती होत. सभामंडपांतील बाहेरील एकंदर खोदीव काम मुंबई इलाख्यांतील कोणत्याही देवालयापेक्षां पहाण्यासारखें आहे. जवळच एक गुहा आहे. तींत एक सत्पुरुष राहत असे. तो मागें होऊन गेलेल्या व पुढें होणाऱ्या गोष्टी सांगत असे व अनेक अद्भुत चमत्कार करून दाखवीत असे असें सांगतात. माघ व. १४ स या ठिकाणीं यात्रा भरते. स्टेशनाहून गांव मैलभर आहे. बैलगाड्या मिळतात. अंबरनाथ हें स्टेशन मुंबईहून ३८ मैल आहे. रेलवेभाडें ८ आणे ( तिसरा वर्ग ).

## अंबसमुद्रम्.

मद्रास इलाख्यांतील तीनेवेली जिल्ह्यांत हा तालुक्याचा गांव आहे.

व साउथ इंडियन रेल्वेचें स्टेशन आहे. गांव दीड मैल. गांवापासून पांच मैलांवर पापनासम् म्हणून महादेवाचें स्थान आहे. येथील धबधबा पाहण्यासारखा आहे. भात ही येथील मुख्य पैदास होय. हें ठिकाण मद्रास पासून ४६८ मैल आहे. रेल्वे भाडें ९ रु. २ आणे. ( तिसरा वर्ग )

## अमरेश्वर.

राजपुताना माळवा रेल्वेच्या मोरटक्का स्टेशनहून ७ मैलांवर नर्मदेच्या कांठीं हें देवालय आहे. याला ओंकारजी अगर ओंकारनाथ महादेव असें म्हणतात. हें महाभारतकालीं बांधलें आहे असें म्हणतात. या पवित्र स्थानास हमेशा हजारों लोक येतात. कित्येक सबंध श्रावण मास येथें काढतात. कार्तिक पौर्णिमेस यात्रा भरते. धर्मशाळा आहे. मोरटक्का हें स्टेशन अजमीरहून ३९६ मैल आहे. तिसरा वर्ग रेल्वेभाडें ३ रु. ११ आणे लागतात.

## अमृतसर.

पंजाबांत नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवरील हें मोठें शहर आहे, येथील पाहण्याचें मुख्य ठिकाण म्हणजे सोन्याचें देवालय. याला शीख लोक दरबार साहेब असें म्हणतात. हें शीखांचें पवित्र स्थान आहे. हें देवालय इ. स. १५८६ त बांधलें आहे. हें देवालय एका मोठ्या तळ्यांत असून संगमरवरी दगडानें बांधलेलें असल्यामुळें विशेषच शोभा आली आहे. मंडप सोन्याच्या पातळ पत्र्यानें मढविलेला आहे. तळ्याभोवतींही संगमरवरी दगडांची फरसबंदी केली आहे. या ठिकाणीं शीखांचे धर्मग्रंथ फार काळजीनें ठेवलेले आहेत. टाउन हाल, हाल बाजार वगैरे दुसरीं ठिकाणें आहेत. दिवाळीस यात्रा भरते त्यावेळेस पंजाबच्या सर्व भागांतून लोक येतात. अमृतसर हें सतरंज्या व शाली यांविषयीं प्रसिद्ध आहे, पारिस येथील प्रदर्शनांत या कौशल्याबद्दल सोन्याचें पदक मिळालें आहे. लाला संतराम यांनीं बांधलेली हिंदूंची धर्मशाळा व मियान महमदशहा यांनीं बांधलेली मुसलमानांची धर्मशाळा या दोन्ही हाल बाजारांत आहेत. अमृतसरहून लाहोराला सहा आणे पडतात.

## अपेकोंडू.

मद्रास इलाख्यांत विझागापट्टम जिल्ह्यांत समुद्रकिनारीं हा गांव

आहे. विझागापट्टम स्टेशन पासून १३ मैल आहे. हें ठिकाण सोमेश्वरदु या देवस्थानामुळें प्रसिद्ध आहे. विझागापट्टम स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. दोन्ही खेपांचे मिळून सरासरी २॥ रुपये पडतात. विझागापट्टम मद्रासहून ४८७ मैल आहे. रेलवेभाडें ६ रु. ६ आणे.

### अनम समुद्रम् पेट.

मद्रास इलाख्यांत नेलोर जिल्ह्यांत हा गांव आहे. येथें एक सुंदर मशीद असून दक्षिणेंतील अति प्राचीन इमारतींपैकीं ही एक आहे. ह्या मशिदीचा स्थापक महमद रहिमतुल्ला याच्या स्मरणार्थ येथें मोठा ऊरूस जुलई महिन्यांत भरतो. ह्या मशिदीला आठ गांवांची नेमणूक आहे.

### अरीपाद अथवा हरिपाद.

त्रावणकोर संस्थानांत हें एक पवित्र स्थान आहे. येथून साऊथ इंडियन रेलवेचें जवळचें स्टेशन म्हणजे क्विलन हें ३६ मैल आहे. देवालयाची इमारत बघण्यारखी आहे. येथील खर्चाप्रीत्यर्थ संस्थानांतून बरीच रक्कम मिळते. वेलायुध स्वामीप्रीत्यर्थ येथें वर्षांतून तीन उत्सव होतात. क्विलन स्टेशनवर धर्मशाळा नाहीं. व गाडी वगैरेही मिळण्याची सोय नाहीं. क्विलन मद्रासहून ५५५ मैल आहे. तिसऱ्या वर्गाचा रेलवे चार्ज ६ रु. १ आणा लागतो,

### अरकोनम्.

हें मद्रास व साउथ इंडियन रेलवेचें जंक्शन आहे. येथून कांजीवरम हें ठिकाण १७ मैल आहे. ह्या ठिकाणीं दक्षिण हिंदुस्थानांत जीं सुप्रसिद्ध देवालयें आहेत त्यांपैकीं कांहीं आहेत. श्रीदेवराज स्वामीचे देवालयांत वैशाखांत मोठा उत्सव होतो. तो दहा दिवस असतो. हिंदुस्थानच्या सर्व भागांतून लोक येतात. स्टेशन जवळच सर्व जातीच्या लोकांचीं अन्नसत्रें व खाणावळी आहेत. जेवणाची चांगली सोय आहे. अरकोनम् मद्रासहून ४३ मैल आहे. मेलनें ९ आणे व पॅसेंजरनें आठ आणे पडतात.

### अरुणाचल.

हें साऊथ इंडियन रेलवेचें स्टेशन आहे. त्याचें सध्याचें नांव तिरुवनमलाय असें आहे. पांडिचरीहून १४ आणे पडतात. स्टेशनाच्या पश्चिमेस अर्ध्या मैलावर अरुणाचल हें पवित्र स्थान आहे. देवालय एका टेंकडी-

वर आहे. ही टेंकडी समुद्रसपाटीपासून २६६४ फूट उंच आहे. महादेव पार्वती व ब्रह्मदेव इत्यादींच्या मूर्ती आहेत. स्टेशनवर घोड्याचे झटके मिळतात. तिरुवनमलाय काटपाडी जंक्शनहून ५८ मैल आहे. रेलवे भाडें ११ आणे लागतें.

## अशिआ.

बंगाल्यांत कटक जिल्ह्यांत या नांवाची एक डोंगरांची रांग आहे. या रांगेंत बौद्ध मुसलमान व हिंदु यांचीं प्राचीन देवालयें, गुहा, तटबंदी व खोदविकाम वगैरेचे अवशेष अद्यापि आढळतात. मुख्य मुख्य टेंकड्यांवर बौद्धांचे अवशेष असून भोंवतीं सागवानी झाडांचें जंगल आहे. ह्यांपैकीं एका टेंकडीवर इंद्राणीच्या दोन सुंदर मूर्ती आहेत.

## अवनी अथवा अवंतिका क्षेत्र.

हा गांव म्हैसुर संस्थानांत कोलार जिल्ह्यांतील मुलबागल तालुक्यांत आहे. अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका पुरीद्वारावतीश्चैव सप्तैते मोक्षदायिकाः यांत वर्णिलेल्या सात महा पवित्र क्षेत्रांपैकीं हें अवंतिका क्षेत्र आहे. प्राचीनकाळीं याला दक्षिण गया असें म्हणत असत. येथें राम, भरत, शत्रुघ्न इत्यादींचीं अनेक देवालयें आहेत. असें म्हणतात कीं, श्रीरामचंद्रानीं लोकापवादास्तव सीतेचा त्याग केला तेव्हां सीता या ठिकाणीं येऊन राहिली. येथेंच तिला पुत्ररत्न झालें. जवळच जी टेंकडी आहे तिला वाल्मिकी पर्वत असें म्हणतात. या ठिकाणींच वाल्मिकी मुनी राहत असत व त्यानीं सीतेचा योग्य संभाळ करून तिच्या मुलांस विद्यादान दिलें हें रामायणांत प्रसिद्धच आहे. स्मार्त शाखेचे गुरू येथेंच राहतात. रामलिंगेश्वर हें लिंग रामांनीं स्थापिलेलें आहे शिवरात्रीस दहा दिवस फार मोठा उत्सव होत असतो. या वेळीं गुरांचा व्यापार मोठा होतो. वीस हजारांवर जनावरें येतात. बेटमांगला येथील पाणीगिरण येथून सात मैल आहे. अवनी हें मद्रास आणि सदर्न मराठा रेलवेच्या बौरिंगपेठ स्टेशनहून २२ मैल आहे. स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. अवनीला एकच धर्मशाळा आहे. बौरिंगपेठ मद्रासहून १७६ मैल आहे. तिसऱ्या वर्गाचें रेलवे भाडें १ रु १४ आणे लागतें.

## अयोध्या.

हें प्राचीन शहर संयुक्त प्रांतांत शरयु अथवा गोग्रा नदीचे कांठीं आहे. जुनें शहर बहुतेक नामशेष झालेलें आहे. कांहीं जुने अवशेष अद्यापि दिसतात. कोसल देशाची व राजा रामचंद्राची राजधानी असल्याविषयीं ह्याची पुराणांतरीं प्रसिद्धीच आहे, राजा विक्रमादित्यानें इ० स० पूर्वीं ५७ वर्षे येथील बऱ्याच प्राचीन देवालयांची दागदुगी केली असें म्हणतात. रामकोट म्हणजे पूर्वीचा किल्ला व राजवाडा, नागेश्वरनाथाचें देवालय, मणिपर्वत हीं जुनीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. खेरीज जन्मस्थान, स्वर्गद्वार हीं दुसरीं ठिकाणें आहेत. नव्या वस्तींत मानसिंगाचें देवालय व हनुमानगढी हीं पहाण्यासारखीं आहेत. रामनवमीची यात्रा फार मोठी भरते. स्टेशनहून शहर ३ मैल आहे, अयोध्या लखनौहून ४६ मैल आहे, रेल्वेभाडें १ रु. १ आ. ३ पै लागतें.

## अक्कलकोट.

हा संस्थानचा गांव सोलापूर जिल्ह्यांत आहे. रेल्वे स्टेशन कडबगांव. कडबगांवाहून अक्कलकोट ७ मैल आहे, अक्कलकोटास राजवाडा, वाड्यांतील "आर्मरी हॉल," स्वामी महाराजांचा मठ, वडाखालच्या पादुका, बाळपा महाराजांचा मठ हीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. स्वामीमहाराज हे एक सत्पुरुष सुमारें ४० वर्षांपूर्वीं होऊन गेले, या सत्पुरुषाचे अनेक चमत्कार अक्कलकोट स्वामीमहाराजांचें चरित्र या पुस्तकांत पहावे, स्वामीदर्शनास लोक हजारों कोसांवरून येतात, सोलापुराहून कडबगांवास रेल्वेभाडें ५ आ. ६ पै लागते,

## इंदूर.

हें संस्थान माळवा प्रांतांत आहे. ही होळकरांची राजधानी आहे. हें अर्वाचीन शहर साध्वी अहल्याबाईनें वसविलेलें आहे, येथील राजवाडा अत्यंत प्रेक्षणीय आहे. याशिवाय पहाण्यासारखीं दुसरीं ठिकाणें म्हणजे लालबाग नांवाचा एक बगीचा आहे. ही महाराजांची उन्हाळ्यांत रहाण्याची जागा आहे. पशुसंग्रह वाखाणण्यासारखा आहे. टांकसाळ, मार्केट, कापसाच्या गिरण्या इत्यादि दुसरीं ठिकाणें आहेत, येथील राजकुमार कालेजांत माळव्यांतील बालराजांस शिक्षण देण्यांत येत असतें, इंदुर

अजमीरहून ३०७ मैल व मुंबईहून ९२२ मैल आहे, रेल्वे भाडें अनुक्रमें ३ रु. ३ आणे व ९ रु. १० आणे लागतें,

## इगतपुरी.

हें जी. आय. पीचें स्टेशन व नासिक जिल्ह्यांतील तालुक्याचा गांव आहे. हें हवाशीर ठिकाण थळघाटचे माथ्याशीं ह्मणजे समुद्रसपाटीपासून सुमोरें २००० फूट उंच आहे. स्टेशनहून अर्धा मैलावर एक सुंदर तलाव आहे. ह्या तळ्यापासूनच इगतपुरी व कसारा या दोन्ही गांवांस पाण्याचा पुरवठा होतो. इगतपुरी मुंबईहून ८५ मैल आहे. रेलवे भाडें १४ आणे लागतें. गांवांत दोन तीन धर्मशाळा आहेत.

## इरोड.

मद्रास इलाख्यांत कोईमतूर जिल्ह्यांत असून साउथइंडियन रेल्वेचें जंक्शन आहे. त्रिचनापल्ली तांजोरकडे व जाणारांस या ठिकाणीं उतरावें लागतें. स्टेशनाहून दोन मैलांवर कावेरी नदी आहे. येथून सात मैलांवर कावेरी व भवानी या नद्यांच्या संगमावर भवानीचें एक पवित्र स्थान आहे, कपास व केळीची लागवड इकडे मुख्यतः होते, येथें डेप्युटी कलेक्टर व तहशिलदार रहातात, स्टेशनजवळ धर्मशाळा व खाणावळी आहेत, इरोड मद्रासहून २४ मैल आहे, रेलवेभाडें २ रु. ९ आणे लागतें.

## उदेपूर.

हें राजपुतान्यांतील प्रमुख संस्थान आहे. पुष्कळ रजपूत संस्थानांनीं मोंगलांपुढें हात टेकले, परंतु उदेपूरचें शूर घराणें कधींच हार गेलें नाहीं. उदेपुरास शिसोदे वंशांतील राजे राज्य करतात. हें अस्सल क्षत्रिय घराणें आहे, अकबर बादशहाचे वेळेस कांहीं दिवसपर्यंत मोंगल सैन्यानें उदेपुरास ग्रासून टाकलें होतें परंतु त्यावेळचा महाप्रतापी व शूर राजा महाराणा प्रतापसिंह ह्यानें आपला बाणा न सोडतां अखेरीस आपलें राज्य संपादन केलें. राजवाडा व जगन्नाथाचें देऊळ हीं येथील प्रेक्षणीय ठिकाणें आहेत. उदेपूरच्या उत्तरेस १२ मैलावर एकलिंगजी म्हणून महादेवाचें स्थान आहे. येथील लिंगास चार मुखें आहेत, समोर पितळेचा नंदी आहे, व देवालयाजवळ सुंदर तीर्थ आहे. उदेपूर स्टेशन अजमीरहून १८९ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. १४ आ. ६ पै. लागते.

## उज्जनी.

हें शहर ग्वाल्हेर संस्थानांत क्षिप्रानदीचे कांठीं असून जंकशन स्टेशन आहे. हें पूर्वीं माळवा प्रांताचें राजधानीचें शहर होतें. हिंदुस्थानची मध्यरेषा ह्या शहरांतून जात असून खेरीज हें एक पवित्र क्षेत्र आहे. धरणीकंपामुळें नाश पावलेले प्राचीन शहराचे अवशेष अद्यापि शहराच्या पूर्वेस आहेत. शहराच्या दक्षिण भागास वेधशाळा आहे, ती जयपूरचा राणा जयसिंग यानें उभारलेली आहे. येथून अफू मुख्यत्वेंकरून बाहेर जाते. ग्वाल्हेरच्या महाराजांचा राजवाडा स्टेशनहून २ मैलांवर आहे, उज्जनी मुबईहून २२० मैल आहे, रेलवे भाडें २ रु, ९ आणे लागतें.

## उमरावती.

हें वऱ्हाडांतलें सुप्रसिद्ध व संपन्न शहर आहे. येथील अंबेचें देवालय नामांकित आहे. उमरावतीस बडनेरावरून जावें लागतें. स्टेशनाहून सुमारें अर्ध्या मैलावर शहरचा अंबादरवाजा लागतो. देवालय फारच भव्य असून देवीचें दर्शन झाल्यावर मनुष्य अगदीं चकित होऊन जातो. देवीला लाखों रुपयांचे अलंकार असून शहरांतील घरें अजमासें ४००. देवीचें नांवें आहेत व शिवाय जमीनी वगैरे उत्पन्न रगड आहे. येथील जुन्या शिखराचा जीर्णोद्धार मन्याबाई वारकरी या बाईनें शके १८९६ त केला आहे. कापसाच्या पैदासीबद्दल वऱ्हाडप्रांत प्रसिद्धच आहे. येथें कापसाच्या अनेक गिरण्या आहेत. उमरावती मुंबईहून ४१९ मैल असून रेलवेभाडें ४ रु. ६ आ. ३ पै लागतें.

## एरंडोलरोड.

हें स्टेशन जी. आय. पीच्या जळगांव-अमळनेर शाखेवर आहे. एरंडोल हा खानदेशांतील तालुक्याचा गांव स्टेशनापासून ७ मैल आहे. स्टेशनहून २५ मैलांवर " उनवदेव " म्हणून उष्ण पाण्याचे झरे सातपुड्याच्याखालीं आहेत. डोंगरांत एक जुनें देवालय आहे, त्याच्या तळाशीं एक दीर्घचतुरस्त्र भोंक आहे त्यांतून हें उष्ण पाणी बाहेर वहातें. देवास जाण्यास एक रस्ता आहे पण तो झऱ्याच्या वरच्या भागास आहे. स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. एरंडोलरोड मुंबईहून ३११ मैल आहे, रेलवेभाडें ३ रु. ९ आणे लागतें.

## एलेफंटा

मुंबईहून सहा मैलांवर हें एक बेट आहे, ह्या बेटास हें नांव पोर्तुगीज लोकांनीं दिलें आहे. किनाऱ्यावर उतरण्याची जी जागा आहे तेथें एक हत्तीचा पुतळा आहे, त्यावरून हें नांव पडलें आहे. हें बेट येथील लेण्यांमुळें प्रसिद्ध आहे, येथें जीं अनेक लेणीं आहेत, त्यांत त्रिमूर्ती म्हणजे सत्व, रज, तम अथवा ब्रह्मा, विष्णू, महेश या देवतांची मूर्ती असलेलें देवालय अत्यंत प्रेक्षणीय आहे, खेरीज अर्धनारीनटेश्वर ही प्रचंड मूर्ती सुमारें १७ फूट उंच आहे. शिव आणि पार्वती यांचा विवाह वगैरे दुसरीं पुष्कळ देवालयें अवश्य जाऊन बघण्यासारखीं आहेत.

## ओरिसा लेणी.

ओरिसा प्रांतांतील उदयगिरि पर्वतांत हीं लेणीं असून त्यांतील सुमारें सोळा फार महत्वाचीं आहेत. यांतील राणी-का-नूर म्हणजे राणीचा महाल हीं लेणीं सर्वोत्कृष्ट आहेत व तीं दुमजली आहेत,

## ओंकार मांधाता.

हें नर्मदेंतील पवित्र स्थान मध्यप्रांतांत आहे. राजपुताना माळवा, रेलवेच्या मोरटक्का स्टेशनहून ७ मैल आहे. मांधाता हें नर्मदेमधील एक बेट आहे. या ठिकाणीं अनेक देवालयें असून त्यांत ओंकारेश्वर व अमरेश्वर ह्या दोन स्थानांचें फार महत्त्व आहे. स्कंदपुराणांतील नर्मदाखंडांत ह्या बेटाचें वैदुर्यमणिपर्वत असें वर्णन आढळतें. पण सूर्यवंशीय राजा मांधात्री यानें केल्यापासून मांधाता हें नवीन नांव पडलें. ओंकारेश्वराची यात्रा कार्तिकी पौर्णिमेस भरते. असें म्हणतात कीं, कलियुगाचीं ५००० वर्षें भरलीं तेव्हां ( १८९५ ) गंगेचें महात्म्य कमी झालें पण नर्मदेचें आहे तसेंच आहे, व तें सतत रहाणार. मांधाता येथें बेटावर धर्मशाळा आहे. मोरटक्का हें स्टेशन अजमीरहून ३९६ मैल आहे. रेलवे भाडें ३ रु. ५ आणे लागतें.

## कावेरी.

ही दक्षिण हिंदुस्थानांतील मोठी नदी पवित्रता, रमणीयत्व व उपयुक्तता या तीन्ही दृष्टींनीं सारखीच प्रसिद्ध आहे. हिला दक्षिणगंगा असें म्हणतात. आग्नेय व स्कंदपुराणांत अशी कथा आहे कीं, ब्रह्मदेवानें

आपली मुलगी लोपामुद्रा हीस कावेर मुनीच्या स्वाधीन केलें व मुनीस आपला पिता मानून राहण्यास सांगितलें. तेव्हां आपल्या दत्तक पित्यास मोक्ष मिळवून देण्याकरतां लोपामुद्रेनें कावेरी नांव घेऊन नदीस्वरूप धारण केलें. म्हणून वर्षास एकदां भागीरथी देखील या ठिकाणास येते असें मानतात. तळकावेरी म्हणजे जेथें उगम आहे तेथें प्राचीन देवालयें आहेत. म्हैसूर संस्थानांत या नदीच्या प्रवाहांत श्रीरंगपट्टम व शिवसमुद्रम अशीं दोन बेटें आहेत, शिवसमुद्रम बेटास वळसा घातल्यावर नदी दुभंगते व हे दोन्ही भाग २०० फूट ऊंचीवरून खालीं खळग्यांत उडी घेतात. ह्या धबधब्यांचा देखावा अप्रातिम आहे. हिच्या कांठीं श्रीरंगम् म्हणून अति-पवित्र स्थान त्रिचनापल्लीहून दोन मैल आहे. त्रिचनापल्ली हें साऊथ इंडियन रेलवेचें स्टेशन मद्रासहून ३३१ मैल आहे. रेलवेभाडें ३ रु. ९ आणे लागतें.

## कानपूर.

हें औध रोहिलखंड, बी. बी. सी. आय, ईस्ट इंडियन, जी. आय्. पी, आणि बेंगाल आणि नॉर्थ वेस्टर्न या पांच रेलवेचें जंक्शन स्टेशन असून संयुक्त प्रांतांतील लष्करचें एक मोठें ठिकाण आहे. हें शहर ५७ सालच्या बंडामुळें प्रसिद्ध आहे. कत्तल ज्या ठिकाणीं झाली ती जागा नदीजवळ अद्यापि दाखवितात. प्रेतांना ज्या विहीरीत टाकलें होतें त्यांवर स्मारक म्हणून एक संगमरवरी पुतळा उभारला आहे. या स्मारकाभोंवतीं एक सुंदर बगीचा आहे. कानपूर हें व्यापाराचें मोठें शहर आहे. कापसाच्या व लोंकरीच्या गिरण्या व अनेक कारखाने यांनीं हें शहर अगदीं गजबजून गेलें आहे, मोठीं मोठीं दुकानें व पुष्कळ युरोपियन लोकांच्या इमारती पाहण्यासारख्या आहेत. युरोपियन लोकांची वस्ती या ठिकाणीं पुष्कळ आहे. संयुक्त प्रांतांतील शहरांमध्यें कानपूरचा चवथा नंबर लागतो. शहरांत तीन मोठ्या धर्मशाळा आहेत. कानपूर मुंबईहून ८३९ मैल आहे. रेलवेभाडें ९ रु. १० आणे लागतें.

## कांजीवरम् अथवा कांचीपुरम्.

मद्रास इलाख्यांत चिंगलपटजिल्ह्यांतील हा तालुक्याचा गांव आहे. चोदाव्या शतकांत हें एक राजधानीचें शहर होतें. कांजीवरम् हें भारत

वर्षांतील सात पवित्र स्थानांपैकीं एक आहे. ह्या ठिकाणास दक्षिण काशी असें अन्वर्थक नांव पडलें आहे. सातव्या शतकांत हें बुद्ध लोकांचें आगर होतें. पुढें जैनांचें वर्चस्व होतें. नंतर बाराव्या शतकाचे सुमारास हिंदूच्या वर्चस्वाखाली आलें, दक्षिणेंतील सर्वांत मोठी अशीं येथील दोन देवालयें कृष्णराय यांनीं इ. स. १५०९ चे सुमारास बांधलीं.

थोरलें कांजीवरम् व धाकटें कांजीवरम् या दोन्ही ठिकाणीं अनेक देवालयें व गोपुरें आहेत. थोरल्या कांजीवरमास महादेवाचें विस्तीर्ण देवालय आहे. येथील गोपुर व सभामंडपाचें काम अप्रतिम आहे. येथून दोन मैलावर धाकट्या कांजीवरमास विष्णूचें देवालय आहे. येथील सभामंडपावरील खोदकामही विशेष प्रेक्षणीय आहे. येथील देवाचे रत्नखचित अलंकार फार मौल्यवान् आहेत. येथें वैशाखांत यात्रा भरत असते तिला फार लांबचे लोक येतात. रामेश्वरास जाणारे या ठिकाणीं उतरल्याखेरीज जात नाहींत, कांजीवरम् एस. आय्. आर्चें स्टेशन मद्रासहून ५९ मैल आहे. रेल्वेभाडें ११ आणे लागतें.

## कडप्पा.

हें मद्रास आणि सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन असून जिल्ह्याचा गांव आहे. मद्रास इलाख्यांतील हें एक चांगलें व्यापारी शहर आहे. शहरांत पूर्वीच्या नबाबांचे चार राजवाडे असलेल्या इमारतींत सध्या सरकारी कचेऱ्या आहेत. जिल्ह्यांत चोंहीकडे विशेषतः मदनपल्ली येथें प्रेक्षणीय इमारती आहेत. कडप्पा हें नांव कृपा शब्दावरून निघालें असें म्हणतात. कोणी गडप्पा म्हणजे मार्ग तीरूपतीचा मार्ग अशी व्युत्पत्ती लावतात. मुसलमानी अमलांत नेकनामाबाद असें म्हटलें जात होतें. स्टेशनवर धर्मशाळा आहे. मद्रासहून कडप्पा १६२ मैल आहे. रेलवे भाडें १ रु. ११ आणे लागतें.

## कादिरी.

मद्रास इलाख्यांत कडापा जिल्ह्यांतील हा तालुक्याचा गांव आहे. येथें नरसिंहस्वामी म्हणून महाविष्णूचें देवालय आहे. फाल्गुनांत मोठी यात्रा भरते. छत्रम् म्हणजे धर्मशाळा आहे. गहुं, चणे, एरंडी, चिंच व तरवडाची साल हे येथील मुख्य उत्पन्नाचे पदार्थ आहेत. कादिरी हें एस्. आय्.

रेल्वेचें स्टेशन मद्रासहून ३९९ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ७ आणे पडतें.

## कैलास.

हें पवित्र स्थान हिमालयांत ब्रिटिश सरहद्दीच्या पलीकडे सिंधु व सतलज या नद्यांच्या उगमापाशीं आहे. हा पर्वत समुद्रसपाटीपासून २०२२६ फूट उंच आहे. कैलास हें महादेवाचें आवडतें स्थान असल्याविषयीं पुरातनग्रंथांत वर्णिलेलेंच आहे. हंस जेथें विहार करतात असा मानस सरोवर कैलास पर्वताच्या नैऋत्येस आहे. या ठिकाणचें सविस्तर व मनोहर वर्णन कैलासमानससरोवरवर्णन या पुस्तकांत वाचकांनीं पहावें. येथून आसपास दिसणारीं बर्फाच्छादित गिरीशिखरें व त्यांपासून होणारा आनंद हीं शब्दांनीं वर्णन करण्यास ही लेखणी असमर्थ आहे.

## कलिंजर.

हें ठिकाण व येथील सुप्रसिद्ध डोंगरीं किल्ला संयुक्त प्रांतांतील बांदा जिल्ह्यांत आहे. बांदाहून कलिंजर ३३ मैल आहे. कलिंजर हा बुंदेलखंडांतील एक अतिशय जुनाट किल्ला आहे, कलिंजरचें महात्म्य महाभारतांत निवेदिलेंच आहे. शहरास सात दरवाजे आहेत. कोटतीर्थ, मृगधारा, नीलकंठाचें देऊळ हीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. मृगधारा हें नांव पडण्याचें कारण, याठिकाणीं सात हरणांस मारिलें आहे, हे सात हरिण ऋषिशिष्य असून कांहीं शापामुळें त्यांना हरिणाचा जन्म आला होता. येथें मरण पावल्यावर पुढें ते कुरुक्षेत्रीं पुनरपी ब्राह्मणजन्मास आले. असें म्हणतात. कलिंजर येथें मुसलमानांच्या पुष्कळ मशिदी आहेत. येथील हवा अत्यंत सुखकर असून एकंदर देखावा रमणीय आहे. कलिंजर हें जी. आय. पी च्या झांशी माणिकपूर शाखेवरील बादोसा स्टेशनाहून १८ मैल आहे. बादोसा झांशींहून १४९ मैल आहे. रेलवेभाडें २ रुपये पडतें.

## कनोज.

संयुक्त प्रांतांत हें एक पुरातन शहर काली नदीचे कांठीं आहे. प्राचीन काळीं आर्य साम्राज्याचें हें एक राजधानीचें शहर होतें. प्राचीन सुंदर इमारतींचे अवशेष कनोजच्या आसपास चार पांच मैल चोहोंकडे अद्यापि

आढळून येतात. त्यांत राजा अजयपाळ हें ठिकाण पहाण्यासारखें आहे. जुम्मा मशीद म्हणून दुसरी जागा आहे. नाणीं व दुसऱ्या जुन्या वस्तु विपुल सांपडतात. हें शहर एका कालीं आर्य सुधारणेचें माहेरघरच होतें. अत्तर व सुगंधी पदार्थांविषयीं कनोज सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. कनोज बी. बी. सी. आय, रेलवेचें स्टेशन कानपूरहून ४९ मैल आहे. रेलवेभाडें ८ आणे ३ पै पडतें.

## कांपिल.

हा गांव संयुक्त प्रांतांतील केमगंज तालुक्यांत आहे. ही द्रुपद राजाची राजधानी असल्याविषयीं महाभारतांत वर्णिलें आहे. येथें द्रौपदीकुंड ह्मणून एक जागा आहे, ती लोक मोठ्या अभिमानानें दाखवितात. येथें वर्षांतून दोनदां यात्रा भरते, पण धर्मशाळा नाहीं. केमगंज येथें चाकू, आडकित्ते व कुलुपें तयार होतात, नारिंगें, तंबाखू, बटाटे, चाकू, आडकित्ते वगैरे जिन्नस बाहेर जातात. केमगंज बी. बी. सी. आय रेलवेनें १०४ मैल आहे, रेलवेभाडें १ रु. २ आणा लागतो.

## कण्व आश्रम.

हरिद्वारहून दक्षिणेस ३० मैलांवर आहे. हा ऋषिआश्रम आहे. तेव्हां तो किती पवित्र आहे हें सांगण्याचें कारणच नाहीं, आर्या शकुंतला या ठिकाणींच जन्मली व वाढली, हें इतिहासांत प्रसिद्धच आहे. हिमालयांत हें स्थान असल्यामुळें येथील शीतल वायु व निसर्ग शोभा अनुपम आहे. हरिद्वार सहारणपुराहून ४९ मैल आहे. रेलवेभाडें ११ आणे ३ पै लागतें.

## कनखल.

हें ठिकाण हरिद्वारच्या दक्षिणेस एक मैलावर आहे. या ठिकाणीं गंगेच्या तिन्ही पात्रांचा संगम आहे. दक्षप्रजापतीनें यज्ञ केला व पार्वतीचे आदरातिथ्य न झाल्यामुळें तिनें अग्निकाष्ठ भक्षण केलें तें हेंच ठिकाण होय. या ठिकाणीं दक्षेश्वराचें देऊळ आहे. जवळच्या टेंकडीवर महादेवाचें त्रिशूळ आहे, तें कोणीं व केव्हां येथें ठेवलें व कशाचें केलें आहे याचा मागमूस लागत नाहीं. भागीरथीचे काठीं बगीचे व वनश्री ब-

हारीची आहे. हरिद्वारला धर्मशाळा वगैरेची सोय असल्यामुळें यात्रेकरू येथून आल्या दिवशींच हरिद्वारला परततात.

### कपुरथळा.

हें पंजाबांत एक संस्थान आहे. नार्थ वेस्टर्न रेलवेच्या करतरपूर स्टेशनहून ७ मैल आहे. स्टेशनवर एक्के मिळतात. महाराजांचे सुंदर बागबगीचे व राजवाडे प्रेक्षणीय आहेत. फेब्रुवारी महिन्यांत चौकीपीर ह्मणून मुसलमानांचा मोठा उरुस भरतो. कपुरथळा जालंदर शहरापासून ११ मैल आहे. चांगली सडक आहे. जालंदर लाहोरहून ८१ मैल आहे. रेलवेभाडें १५ आणे ३ पै लागतें.

### कार्ला.

हें जी. आय. पी. चें पुणें स्टेशन सोडल्यानंतर लागतें. कार्ल्याचीं लेणीं सुप्रसिद्ध आहेत. स्टेशनहून लेणीं ३ मैल आहेत. सडक चांगली आहे. डोंगराच्या पायथ्याशीं वर वाहून नेणारे लोक बसलेले असतात. वर नेण्यास १ रुपया माणशीं लागतो. माथ्यावर गेल्यावर द्वाराशीं श्रीएकवीराभवानीचें देवालय लागतें, समोरच लेण्याचा मुख्य भाग जो सभामंडप तो आहे. खांबापासून वरील सर्व काम कोरींव आहे. मध्यभागीं एक उच्चासन आहे व त्यावर एक लांकडी छत्री आहे. स्टेशनच्या जवळच सुप्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यांचा चित्रांचा छापखाना जरूर पहाण्यासारखा आहे. येथून एक मैलावर भोजलेणीं म्हणून जुनीं लेणीं असून वर लोहगड व विसापूर हे मराठ्यांचे सुप्रसिद्ध किल्ले आहेत. मुंबईहून कार्ला ८५ मैल आहे, रेलवेभाडें १ रुपया ५ आणे लागतें.

### कर्णप्रयाग.

हा गांव संयुक्त प्रांतांतील गर्वाल जिल्ह्यांत पिंदार आणि अलकनंदा यांच्या संगमावर आहे. हिमाचलाचे वाटेंत हें एक तीर्थ आहे. येथील उमेचें जें मुख्य देऊळ आहे तें आद्य शंकराचार्यांनीं पुनः बांधलें आहे असें म्हणतात. पिंदार नदींत लोखंडी लोंबता पूल आहे. कर्णप्रयागास हरिद्वारहून जाणें चांगलें कारण तट्टें वगैरे मिळतात. येथें धर्मशाळा आहे.

### कसारा.

हें स्टेशन घाटांत इगतपुरीजवळ आहे. कसारा हें समुद्रसपाटीपासून

९३० फूट उंच आहे. दोन तीन बोगदे ओलांडल्यावर सुमारें ४॥ मैलांवर रिव्हार्सिंग हें स्टेशन लागतें. या ठिकाणीं गाडीची गती बदलते. ह्मणजे मागच्या बाजूचें एंजिन पुढें लागतें. डोंगराचे कडे व बोगदे फारसे न लागतां रेलवेस रस्ता चांगला मिळावा व मध्यें मध्यें आलेले बांक टाळावे म्हणून हें स्टेशन बांधलें आहे. सुमारें नऊ बोगदे ओलांडल्यावर एथेलनचा पूल लागतो. या पुलाखालील दरी १९० फूट खोल आहे. हा पूल सर्व हिंदुस्थानांत अतिशय उंच आहे असें म्हणतात. थळघाटचा रेलवे रस्ता इ. स. १८६१ त सुरू झाला आहे. घाटांतील रस्त्याचें बांधकाम रेलवे कंपनीचे इंजिनियर जेम्स बर्कले यांच्या हातून सुरू झालें. परंतु काम पूर्ण झालेलें पहाण्यास हे हयात राहिले नाहींत. कसारा स्टेशन मुंबईहून ७५ मैल आहे, रेलवेभाडें १३ आणे लागतें.

## काशीपूर.

नैनितालहून ४५ मैल आहे. जवळचें रेलवे स्टेशन म्हणजे काथगोडम ही रोहिलखंड कुमानरेलवेची उत्तर मर्यादा आहे. काशीपूरच्या आग्नयेस बालसुंदरीदेवी म्हणून एक स्थान आहे. यात्रेस फार मोठा जमाव जमतो. मातीचीं भांडीं, जनावरें व शेताचीं आउतें व जंगलांतील लांकडें यांचा व्यापार दांडगा होतो. यात्रेंत या ठिकाणीं जुगार खेळण्याचें फार बंड आहे. काशीपूरचे आसपास पुष्कळ तलाव आहेत, त्यांत द्रोणसागर हा सर्वांत मोठा आहे. काथगोडम येथें गाड्या वगैरे मिळतात. काथगोडम बरेली जंक्शनहून ६६ मैल आहे. रेलवेभाडें १॥ रुपया पडतें.

## काटपाडी.

मद्रासहून ८१ मैल आहे. हें जंक्शन स्टेशन आहे. येथून दक्षिणेस ५७ मैलांवर पिरुवनमलाय म्हणून सुप्रसिद्ध स्थान साउथ इंडियन रेलवेवर आहे. येथून ४ मैलांवर वेलोर हें एक चांगलें व्यापारी शहर आहे. वेलोरास जुना जो किल्ला आहे त्यांत एक देवालय आहे. येथील द्राविडी नकशीकाम फारच उत्कृष्ट आहे. अलिकडे सरकारनें चांगली दुरुस्ती केली आहे. येथील तुरुंगांत पुष्कळ प्रकारचें कापड तयार होतें. धान्याचा व्यापार बराच आहे. मद्रासहून काटपाडीस १४ आणे पडतात.

## केदारनाथ.

हें हिमालयाचें बर्फाच्छादित शिखर समुद्रसपाटीपासून २२८५३ फूट उंच आह. हें महादेवाचें स्थान आहे. देवळानजीक एक कडा आहे. त्याला भैरवझांप असें म्हणतात. या ठिकाणीं पूर्वीं भाविक लोक मुक्ति मिळण्याकरितां कड्यावरून उडी घेऊन आत्महत्त्या करीत असत. परंतु ही चाल इंग्रज सरकारनें अलीकडे बंद करून टाकिली आहे. केदारनाथाचे आसपास दुसरीं चार देवालयें आहेत. या सर्वांस मिळून पंचकेदार असें म्हणतात. केदारनाथास जाण्यास हरिद्वारहून जाणें चांगलें कारण तट्टें वगैरे वाहनें मिळण्याची सोय आहे.

## कोल्हापूर.

हें राजधानीचें शहर असून पुरातन पवित्र क्षेत्र आहे. कोल्हापूरचे महाराज हे शिवाजी महाराजांचे वंशज आहेत. कोल्हापूरास श्रीक्षेत्र करवीर असें म्हणतात. येथें महालक्ष्मीचें भव्य देवालय आहे. कोल्हापूरास देवीचे दर्शनाकरितां लोक फार लांबलांबून येतात. कोल्हापुरापासून ९ मैलांवर जोतीबाचा डोंगर आहे. येथें जोतीबा अथवा केदारलिंग हें महादेवाचें स्थान आहे. जोतीबा हें शिंदे सरकारचें कुलदैवत आहे. या डोंगरावर चैत्र महिन्यांत यात्रा भरते. शहरांत टाउनहॉल, महाराजांचा नवीन बांधलेला राजवाडा, दवाखाना ह्या इमारती पहाण्यासारख्या आहेत. सुती व लोंकरी कापड, मातीची भांडीं, सुगंधी सामान व खोटे दागिने वगैरे जिन्नस तयार होतात. कोल्हापूरास देवीचें स्थान असल्यामुळें त्यास करवीरक्षेत्र असें म्हणतात. कोल्हापूर पुण्याहून १८९ मैल आहे. रेल्वेभाडें १ रु. १५ आणे ९ पै लागतें.

## कोलाघाट.

हें बंगाल नागपूर रेलवेचें स्टेशन हवऱ्याहून ३४ मैल आहे, रेलवे भाडें ७ आणे ३ पै लागतें. येथून दहा मैलांवर तुमलुक अथवा ताम्रलिप्ती हें ठिकाण आहे. या ठिकाणचा उल्लेख ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकांत हिंदुस्थानांत येऊन गेलेला चिनी प्रवासी हुएनत्संग यानें आपल्या ग्रंथांत केला आहे. मौर्यवंशीय राजे पूर्वी येथें राज्य करीत असत. येथील देवालयांत बर्गभीम व कृष्णार्जुन हीं ठिकाणें सुप्रसिद्ध आहेत.

कृष्णार्जुनाचें देवालय महाभारतांतील अश्वमेधपर्वांत प्रसिद्ध असलेल्या ताम्रध्वज राजानें स्थापिलें आहे असें म्हणतात. स्टेशनजवळच धर्मशाळा आहे व गांवांत खाणावळीची सोय चांगली आहे.

## कोटण्णकोडा.

मद्रास इलाख्यांत गुंटुर जिल्ह्यांतील नरसारावपेठ तालुक्यांत हा गांव असून या नांवची एक टेंकडी आहे. ही टेंकडी नरसारावपेठहून आठ मैल आहे. वर महादेवाचें स्थान आहे. माघ महिन्यांत या ठिकाणीं मोठी यात्रा भरते. सरासरी ६०००० वर लोक येतात. यात्रेंत इमारतीचे लांकडाचा मोठा व्यापार चालतो. वेळू व सर्व तऱ्हेच्या लांकडाची पैदास अधिक आहे. टेंकडीवर एक धर्मशाळा आहे. नरसारावपेठ बंगलोरहून ४०९ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ४ आणे ६ पै लागतें.

## कुंभकोणम्.

हें शहर मद्रास इलाख्यांतील तांजोर जिल्ह्यांत आहे. प्राचीनकाळीं चोलवंशीय राजांची राजधानी होती. दक्षिणेंतील हें एक अतिशय पुरातन व पवित्र स्थान असून विद्येविषयीं इतकें प्रसिद्ध आहे कीं, यास हिंदुस्थानचें " आक्सफोर्ड " असें म्हणतात. येथें सर्वांत मोठें जें देऊळ आहे त्याच्या गोपुराची उंची १६० फूट आहे. येथें महामहम् म्हणून जें तीर्थ आहे त्याच्या कांठीं अनेक देवालयें व घाट आहेत. दर बारा वर्षांनीं या ठिकाणीं गंगा येते असें म्हणतात. कुंभकोणम् हें साउथ इंडियन रेलवेचें स्टेशन मद्रासहून १९६ मैल आहे. रेलवेभाडें २ रुपये ३ आणे लागतें.

## कराची.

हें सिंध प्रांतांतील मुख्य शहर व बंदर आहे. शिवाय लष्करचें ठाणें आहे. मुंबईहून कराचीस बोटी आठवड्यांतून तीन वेळां सुटतात. मेल बोटीनें कराचीस पोहोंचण्यास ३८ तास लागतात. कराची हें एक मोठें व्यापाराचें शहर आहे. येथील व्यापार अलिकडे फारच वाढल्यामुळें बंदराचा धक्का फारच मोठा केला आहे. कराचीची हवा आरोग्यास फारच हितकर आहे. येथें वर्षास एकंदर ७ इंच पाऊस पडतो. येथील अलीकडच्या सर्व इमारती चांगल्या बांधलेल्या असून त्यांत सिव्हिल हास्पिटल,

सदरकोर्ट, मार्केट वगैरे पहाण्यासारखीं आहेत. कराची शहर लाहोरहून ७८४ मैल आहे. रेलवे भाडें ९ रु. ३ आणे लागतें.

## कट्टलम्.

हा गांव मद्रास इलाख्यांतील तिनेवेल्ली जिल्ह्यांत असून हें एक हवाशीर ठिकाण आहे. येथें सारा शंभर फूट उंचीचा एक लहानसा धबधबा आहे. त्या खालीं एक देऊळ असून सुंदर तीर्थ आहे. कट्टलम्च्या आसपास दुसरीं बघण्यासारखीं ठिकाणें पुष्कळ आहेत. स्टेशनाहून जवळच कावेरी नदी आहे. या ठिकाणीं नदी अतिशयच अरुंद आहे. साळ आणि नारळ हे दोन जिन्नस मुख्यत्वेंकरून येथून बाहेर जातात. कट्टलम् मद्रासहून १८२ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. १ आणा आहे.

## कलकत्ता.

हें बंगाल इलाख्यांतील मुख्य शहर असून हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याची राजधानी आहे. येथील बहुतेक वस्ती अलीकडची आहे. येथें कालीचें देवालय आहे तें मात्र फार जुनें आहे. ही देवी चतुर्भुज असून ध्यान फार उग्र आहे. मूर्ती उभी असून एक पाय मांडीवर ठेवला आहे व दुसरा आपल्या पतीच्या म्हणजे महादेवाच्या छातीवर आहे. याजबद्दलची अशी कथा आहे कीं, शत्रूचा संहार केल्यावर विजयाच्या आनंदातिशयानें देवीनें नर्तन सुरू केलें. तें इतकें कीं, सर्व पृथ्वी डळमळूं लागली. तेव्हां सर्व देवांची प्रार्थना ऐकून महादेवांनीं तिला स्तब्ध होण्यास सांगितलें. परंतु देवीला पतीचें देखील भान राहिलें नाहीं. पण जेव्हां पतीच्या वक्षस्थलावरच आपला चरणप्रहार होत आहे असें देवीला दिसलें तेव्हां भयचकित होऊन देवीनें आपली जिव्हा बाहेर काढली. तें ध्यान अद्यापि तसेंच आहे. खेरीज बद्रीदासाचें जैनांचें देवालय देखील उत्कृष्ट व बघण्यासारखें आहे. फोर्ट वुइल्यम हा किल्ला बांधण्यास लॉर्ड क्लाइव्हनें १७५७ त सुरवात केली व तें काम १७७३ त पुरें झालें. एकंदर खर्च २००००००० रु. आला असें म्हणतात. कलकत्ता हें एक रमणीय शहर आहे. शहरांतल्या अनेक भव्य व सुंदर इमारती प्रेक्षकाचें मन रिझवून सोडतात. सरकारी टांकसाळ, पदार्थसंग्रहालय, वनस्पतिसंग्रहाच्या बागा हीं दुसरीं पहाण्यासारखीं ठिकाणें आहेत. ह्या बागेंत एक

प्रचंड वटवृक्ष आहे. तो सुमारें १४२ वर्षांचा जुना असून एकदां या एका झाडाखालींच सगळ्या सैन्याचा तळ पडला होता असें म्हणतात. कलकत्त्याहून ३ मैलांवर " भुईकैलास " म्हणून महादेवाचें एक लिंग आहे. कलकत्ता हें व्यापाराचेंही चांगलें भरभराटीचें ठिकाण असून चीन, जपान वगैरे पूर्वेकडील देशांच्या व्यापाराची एक मुख्य पेठ आहे म्हटलें तरी चालेल. कलकत्ता मुंबईहून १३४९ मैल आहे. रेलवेभाडें १३ रु. ३ आणे.

## खांडवा.

हें जी. आय. पी. रेलवेचें जंक्शन स्टेशन मुंबईहून ३९३ मैल आहे. रेलवे भाडें ३ रु. ११ आणे लागतें. लांबचा प्रवास करणारांस वाटेंत मुक्काम करण्यास हें ठिकाण सोयीचें आहे. स्टेशनहून चार मैलांवर तुळजा भवानीची मोठी यात्रा भरते. येथून हें नर्मदेच्या कांठचें पवित्र स्थान ४० मैल आहे. ओंकार मांधातास जाणारांनीं खांडव्याहून सनावदचें टिकिट घ्यावें. खांडवा हें एक व्यापाराचें व महत्वाचें ठिकाण आहे. येथें कापसाचा मोठा व्यापार चालतो. रुईच्या गिरण्या आहेत. शहरास पाण्याचा पुरवठा येथून चार मैलांवर मोघट येथें पाण्याची गिरणी आहे तेथून होतो.

## खाटमांडू.

ही नेपाळ संस्थानाची राजधानी आहे. हें शहर एका दरींत वसलेलें असून समुद्रसपाटीपासून ४५०० फूट उंचीवर आहे. शहरांत राजवाड्यासमोर अनेक सुंदर व नकशीदार देवालयें आहेत. मच्छिंदरनाथ ही येथील ग्रामदेवता आहे. असें म्हणतात कीं नरेंद्रदास या राजाच्या कारकीर्दींत नेपाळांत एकदा १२ वर्षें अवर्षण पडलें होतें. तव्हां ( इ. स. ३४७ ) राजानें आसामांत जाऊन एका बुद्धधर्मीय साधूस आणलें. हा सत्पुरुष राज्यांत आल्यावर पुष्कळ पाऊस पडला व जिकडे तिकडे आबादानी झाली. या गोष्टीचे स्मरणार्थ नरेंद्रदासानें मच्छिंदरनाथाचें देवालय बांधलें व उत्सव चालू केला. हा उत्सव अद्यापि चालू आहे.

## गंगोत्री.

हें ठिकाण संयुक्त प्रांतांतील गर्वाल संस्थानांत आहे. या ठिकाणीं भागीरथीचा उगम असल्यामुळें हें स्थान अति पवित्र आहे. उगमापासून

आठ मैलांवर हिमालयांत भागीरथीचें देवालय आहे. प्रत्यक्ष हिमालय पर्वत व भागीरथीचा उगम येथें असल्यामुळें येथील निसर्गशोभा कवि-कल्पनेस असमर्थ आहे. ह्या स्थानाचें दर्शन झाल्यावर यात्रेचा मार्ग खुंटला असें समजून व तेथें राहण्यास घरेंही नसल्यामुळें यात्रेकरू भागी-रथी घेऊन लगेच परततात.

## गाणगापूर.

हें पवित्र क्षेत्र गाणगापूर स्टेशनपासून १४ मैल आहे. रस्ता चांगला नाहीं. गाणगापूर हें दत्ताचें जागृत स्थान भीमा आणि अमर्जा या दोन नद्यांच्या संगमावर आहे. श्रीच्या मूळ पादुका चांदीच्या डब्यांत ठेवल्या असून त्यांवर केशर व अत्तर यांचें लेपन करीत असतात. उत्सव वर्षां-तून तीन वेळां होतो. शिवाय दर गुरुवारीं पालखी निघते. येथें पिशाच-बाधा असलेले शेंकडों लोक येतात व दत्तसेवेमुळें त्यापासून मुक्त होऊन जातात. आरतीच्या वेळीं बाधा असलेले पुष्कळ लोक ओरडून एकच गर्दी करून सोडतात. ही गम्मत येथें पहाण्यासारखी असते. गांवापासून संगम दोन मैल आहे. या संगमावरच गुरुचरित्रांत वर्णिलेला मूळ औदुं-बर वृक्ष होता. तो भीमेच्या महापुरामुळें सुमारें १९ वर्षांपूर्वी वाहून गेला असें समजतें. नदीवर संगमेश्वराचें देवालय आहे. जवळच भस्माचा भला एक डोंगर आहे. येथें पूर्वी मोठा यज्ञ झाला होता, त्याचें हें भस्म आहे असें म्हणतात शेंकडों वर्षांपासून हजारों लोक भस्म नेतात व त्याचे खळगे पडले आहेत पण अद्यापि तो जशाचा तसा आहे. ज्या महात्म्यांनीं या ठिकाणीं यज्ञ केला ते खरोखरच पुण्यश्लोक होत. गाण-गापूर गांव लहान असून तो मोंगलाई हद्दींत आहे. पुण्याहून गाणगापुराला रेलवेभाडें २ रु. ९ आणे लागतें.

## गडमुक्तेश्वर.

हें औध रोहिलखंड रेलवेचें स्टेशन असून मीरत जिल्ह्यांतील एक जुनें शहर मीरतहून सव्वीस मैलांवर आहे. येथें मुक्तेश्वर महादेवाचें एक मोठें देवालय आहे. जवळच सती गेलेल्या ८७ स्त्रियांचे स्मारकस्तंभ आहेत. कार्तिक महिन्यांत मोठी यात्रा भरते. स्टेशन जवळच दिल्लीच्या एका धनि-

कानें धर्मशाळा बांधली आहे. गडमुक्तेश्वर दिल्लीहून ६४ मैल आहे. रेलवे भाडें १२ आणे पडतें.

## ग्वालेर.

ही शिंदे सरकाची राजधानी आहे. शहर स्टेशनाहून २ मैल लांब आहे. शहराच्या वाटेवरच उजव्या अंगास डोंगरावर ग्वालेरचा मजबूत किल्ला आहे. किल्ल्याची एकंदर लांबी सुमारें दीड मैल आहे. किल्ला प्रेक्षणीय आहे. ग्वालेर हें जैनमताचें एक पुरातन ठिकाण आहे. पद्मनाथ हें जैनांचें जुनें देवालय आहे. खेरीं खडक कोरून तयार केलेलीं जैनांचीं पुष्कळ देवालयें असून त्यांत बहुतेक पहिला तीर्थंकर आदिनाथ याच्या मूर्ती आहेत. किल्ल्यांत " तेलीका मंदिर " म्हणून एक देवालय आहे. महाराज मानसिंग यांनीं सन १४८६ ते १५१६ चे दरम्यान बांधलेला राजवाडा व पदार्थसंग्रहालय ही पाहाण्यासारखीं आहेत. संस्थानचें स्वतःचें पोष्ट ऑफीस, स्टांप व नाणीं आहेत. शेष व सूर्य हीं येथील राजचिन्हें आहेत.

## गोहती.

हें आसाम बेंगाल व ईस्टर्न बेंगाल स्टेट रेलवेचें जंक्शन असून आसामांतील कामरूप जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. हें शहर ब्रह्मपुत्रा नदीच्या दोन्ही बाजूस वसलेलें आहे. महाभारतांत प्रसिद्ध असलेल्या राजा भगदत्ताची राजधानी जी प्रयागज्योतिषपुर ती येथेंच होती असें सांगतात. कामाख्य म्हणून देवीचें देवालय हें एक यात्रेचें ठिकाण आहे. तेथें वर्षास तीन वेळां यात्रा भरते. ब्रह्मपुत्रा नदीच्या पात्रांत एका खडकाचे बेटावर उमानंद म्हणून महादेवाचें एक सुंदर देवालय आहे. गोहती हें असामांतील एक मोठें व्यापाराचें ठिकाण आहे. धर्मशाळा स्टेशनहून दीड मैलावर आहे. स्टेशनवर टिक्का गाड्या मिळतात. पहिल्या तासास १ रुपया व मागाहून दरतासीं आठ आणे असा दर आहे. गोहती चितगागपासून ४८० मैल आह. रेलवे भाडें ७ रु. ८ आणे लागतें.

## गिरनार.

हा पर्वत काठेवाडांत जुनागड शहरापासून पूर्वेस १० मैलांवर आहे. ह्या पर्वताची उंची समुद्रसपाटीपासून सुमारें ३५०० फूट आहे. पालि-

ठाण्याच्या खालोखाल हें एक जैन लोकांचें अति पवित्र स्थान आहे. पर्वताच्या पायथ्याशीं खडकावर इ. स. पूर्वी २५० वर्षांचे अशोकाचे शिलालेख आहेत. नेमिनाथाचे देवालयास जी चढण आहे तिच्या वाटेवर सहा विश्रांतीच्या जागा आहेत. अंबामाता म्हणून देवीचें देवालय आहे. या ठिकाणीं दर्शनास आलेल्या विवाहित वधुवरांची अतिशय गर्दी असते. लग्नानंतर वधुवरांचे पदरास गांठ घालून देवीचे दर्शनास म्हणून नेहमीं पुष्कळ लोक येतात. या पर्वतावर एकंदर सुमारें सोळा देवालयें असून त्या सर्वांत अतिशय जुनें व मोठें म्हणजे नेमिनाथाचें होय. त्या वर जो एक शिलालेख आहे त्यांत इ. स. १२७८ मध्यें ह्या देवाल-याची एकदां दुरुस्ती करण्यांत आली असें म्हटलें आहे. देवालयाच्या आंगणाभोंवतीं सत्तर थडगीं आहेत. त्यांत प्रत्येकीं तीर्थंकर नेमिनाथ या जैन साधूची एक आसनमांडी घालून बसलेली मूर्ती आहे. जुनागड स्टेशनवर तांगे व बैलगाड्या आणि पर्वतावर जावयास डोल्याही मिळतात. जुनागड हें स्टेशन मुंबईहून विरमगांव व वढवाण मार्गें ५५९ मैल आहे. रेल्वे भाडें ९ रु. १५ आणे लागतें.

## गुलबर्गा.

हें निजामचे राज्यांतील दक्षिण भागचें एक मुख्य शहर असून सुभा आहे. स्टेशनापासून गांव सुमारें २ मैल आहे. गावांत मुसलमानांच्या अनेक मशिदी आहेत. त्यांस निजामसरकारांतून नेमणूकी आहेत. येथें बंदे-नवाजचा उरूस जानेवारीच्या आरंभीं फारच मोठा होतो. ४०।५० हजार लोक जमतात. बंदेनवाज हा मुसलमान आवलिया फिरोजशहा या बादशहाचे कारकीर्दींत इ.स. १४१३ मध्यें गुलबर्ग्यास प्रगट झाला. या साधूनें आपल्या हयातींत अनेक चमत्कार केले असें सांगतात. मशीदींतील भिंतींवर कुराणांतील वचनें रेखलीं आहेत. येथील तुरुंगांत निरनिराळ्या प्रकारचे तंबू व उत्तम सतरंजा तयार होतात. गुलबर्गा स्टेशन मुंबईहून ३५३ मैल असून रेलवे भाडें ३ रु. ११ आ. आहे.

## गोकर्ण महाबळेश्वर.

गोकर्णास जाणारांनीं मार्मागोवा स्टेशनवर उतरावें. तेथून बोटीनें ता-डीपोर्ट या बंदरास जावें. ताडीपोर्ट येथें बैलगाड्या गाडीस आठ आणे प्र-

माणें मिळतात. गोकर्णास धर्मशाळा आहे. मार्मागोवा स्टेशन पुण्याहून ३६४ मैल आहे. रेलवे भाडें ४ रु. ११ आ. ३ पै. लागतें.

हें पवित्र स्थान मुंबई इलाख्यांतील उत्तर कानडा जिल्ह्यांत आहे. प्रतापी रावणानें शिवाकडून आत्मलिंग मागून घेतलें, तेव्हां इतर देवांस काळजी पडली. तेव्हां लिंग नेण्यास विघ्न आणण्यास्तव या कामीं श्री गणपतीची योजना झाली. रावण चालला होता त्या वाटेनें गणपतीची स्वारी गुराख्याच्या स्वरूपांत प्रगट झाली. या अवकाशांत रावणास दाट लघुशंका आली, परंतु हातांतलें लिंग खालीं जमीनीवर ठेवल्यास तें तेथेंच स्थानापन्न होईल असा शिवाचा वर होता. तेव्हां तें लिंग धरून रहाण्यास रावणानें त्या गुराख्यास पुष्कळ आळविलें परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. लघुशंका आवरली नाहीं तेव्हां रावणानें लिंग खालीं ठेवलें तें पुन्हां त्यास तेथून हालवितां आलें नाहीं अशी पौराणिक कथा आहे.

## चिदंबरम्.

हें साउथ इंडियन रेलवेचें स्टेशन असून साउथ अर्काट जिल्ह्यांतील तालुक्याचा मुख्य गांव मद्रास तेथून १५४ मैल आहे. तिसरा वर्ग रेलवे भाडें १ रु. १२ आणे लागतें. हा गांव मुख्यत्वेंकरून येथील देवालयांमुळें प्रसिद्ध आहे. कनकसभा म्हणून महादेवाचें मुख्य देवालय आहे. याचा अतिशय जुना भाग हिरण्यवर्णचक्रवर्ति या राजानें बांधला आहे. या राजास रक्तपिती आजार झाला होता. तो येथील तीर्थांत स्नान केल्यामुळें नाहींसा झाला असें म्हणतात. गणेशाचें एक देवालय आहे. येथील मूर्ती हिंदुस्थानांतील कोणत्याही ठिकाणापेक्षां अतिशय मोठी आहे असें म्हणतात. पतंजली, उपमन्य इत्यादि वैदिक कालचे ऋषि सूक्ष्म स्वरूपांत या ठिकाणीं आहेत असें मानतात. वेदाध्ययनाच्या पुष्कळ पाठशाळा आहेत. येथें अनेक धर्मशाळा आहेत त्यांपैकीं आठ फार सोईस्कर आहेत. वर्षांतून दोन मोठ्या यात्रा भरतात. येथून पश्चिमेस वृद्धाचलम्, मनारगुडी वगैरे दुसरीं आणखी प्रसिद्ध ठिकाणें आहेत. मुख्यतः रेशमी लुगडीं या ठिकाणीं तयार होतात.

## चिंचवड.

हा गांव व स्टेशन पुण्याजवळ आहे. येथें दोन सुप्रसिद्ध देवालयें

आहेत.एक मोरया गोसावी यांचें.हें गांवांत आहे. दुसरें गणपतीचें.हें पवनेच्या कांठीं आहे. मोरया गोसावी हे महान् सत्पुरुष सतराव्या शतकांत महाराष्ट्रांत होऊन गेले. दर वर्षास मोठी यात्रा भरते. अजमासें १०००० लोक येतात. श्रीगणपतीचे देवालयाजवळ धर्मशाळा आहे.

## चितोरगड.

हें राजपुताना माळवा व उद्देपूर चितुर रेलवेचें जंक्शन आहे. हा गांव उदेपूर संस्थानांत आहे. चितोरचा किल्ला इतिहासप्रसिद्धच आहे. इतिहासजिज्ञापासून हें ठिकाण फार महत्वाचें आहे. कारण रजपुतांच्या स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ अनेक हृदयद्रावक गोष्टी या ठिकाणीं घडून आल्या आहेत. रजपुतांच्या साध्वी स्त्रियांनीं अनेक खडतर प्रसंगीं " जोहार " केलेलें तें हेंच ठिकाण होय. गड ज्या टेंकडीवर आहे तीं स्टेशनाहून २ मैलांवर आहे. स्टेशनवर उंट व गाड्या वगैरे मिळूं शकतात. चितोरगड मुंबईहून ५२६ मेल आहे. रेलवे भाडें ९ रु ८ आणे लागतें.

## चितूर.

हें एस्. आय्. रेलवेचें स्टेशन असून उत्तर अर्काट जिल्ह्यांतील तालुक्याचा गांव आहे. स्टेशनहून ९ मैलांवर यादमारी—इंद्रपुरी—येथें वरदराज स्वामी व कोथेंदराम स्वामी अशीं दोन प्रसिद्ध देवालयें आहेत. वैशाखांत यात्रा भरते हें ठिकाण मद्रासहून २२१ मेल आहे. रेलवभाडें २ रु. ७ आणे लागतें.

## चित्रकूट.

हें स्टेशन झांशी ते माणिकपूर रस्त्यावर आहे. रामायणांत भरतभेटीमुळें प्रसिद्ध असलेला चित्रकूट पर्वत स्टेशनहून साडेतीन मैलांवर आहे. श्रीरामचंद्रानें या ठिकाणीं कांहीं काल वास केला असल्यामुळें हें स्थान पवित्र आहे. वाटेनें दाट झाडी आहे. हा वृक्षसमुदाय यात्रेकरूंस मार्ग दाखवतो. चित्रकूटास रामसेवकांच्या—माकडांच्या झुंडीच्या झुंडी आहेत. गांवाजवळ मंदाकिनी व पैशुनी यांचा संगम आहे. संगमाहून पर्वत मैलभर आहे. पर्वताच्या सभोंवतीं एकंदर तीनशेंवर देवालयें आहेत. हीं बहुतेक मोठीं मोठीं बांधलीं आहेत. अशा जंगलांत या पर्वतावर असलीं भव्य व मोठीं देवालयें कोणीं व कधीं बांधलीं असावीं अशी जिज्ञासा उत्पन्न होते. परंतु

कसलाही उल्लेख आढळत नाहीं. टेंकडीचे पिछाडीस बाजार आहे. त्याला रामबाजार म्हणतात. प्रदक्षिणेच्या वाटेला चुना घालून चांगली फरसबंदी केली आहे. ही फरसबंदी पन्ना संस्थानचे महाराज रामचंद्र कुमार यांनीं १६० वर्षांपूर्वी केली असल्याचें समजतें. येथून आसपास १० मैलांचे टापूंत हनुमान, धाराकोटतीर्थ, भरतकूप व गुप्त गादावरी अशीं अनेक पवित्र ठिकाणें आहेत. पर्वतावर बैराग्यांची वस्ती बरीच आहे. चित्रकूट झांशीहून १९७ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. २ आणे लागतें.

## जयपूर.

हें राजपुतान्यांतील संस्थान असून हिंदुस्थानांतील अतिशय सुंदर शहरांत याची गणना आहे. या शहराची रचना फारच पद्धतशीर आहे. शहराभोंवतीं मजबूत तट असून तटाचे बुरूज भव्य व उंच असे आहेत. शहराची लांबी २ मैल व रुंदी १ मैल आहे. राजवाडा शहराच्या मध्यभागीं असून वाड्याचा महादरवाजा अतोनात उंच आहे. राजवाड्यांतील दिवाण-इ-खास ह्मणून मानकरी, सरदार वगैरे खाशा मंडळीची बसावयाची जागा, दिवाण-इ- आम. ह्मणजे सार्वजनिक बसावयाची जागा व सुखनिवास हें नवीन शोभायमान ठिकाण हे भाग नामांकित आहेत. येथील सार्वजनिक बगीचे ह्मणजे बागाइतीचा उत्तम नमुना आहे. या बागेंत अल्बर्ट हाल ह्मणून जी इमारत आहे तींत जयपूरचा पदार्थसंग्रह आहे. हा संग्रह फारच मनोरम आहे. संग्रहाची टिपणवही तेथेंच मिळते. टांकसाळ, वेधशाळा व हवामहाल हीं दुसरीं पहाण्यासारखीं ठिकाणें आहेत. याखेरीज अती महत्वाचें ठिकाण ह्मणजे जयपूरहून सात मैलांवर अंबर हें होय. अंबर ही जयपूरची प्राचीन राजधानी होय. हें शहर डोंगराच्या दरींत एका तळ्याचे कांठीं वसलेलें आहे. येथील देवळें, रस्ते वगैरे डोंगरांतून आलेल्या वघळीमुळें विखरून गेले आहेत. तथापि येथील जुना पण भव्य राजवाडा व किल्ला पहाण्यासारखा आहे. येथें कालीचें देवालय आहे. अंबर पहाण्यास पोलिटिकल एजंटाची परवानगी लागते. पदार्थसंग्रहालय इतर दिवशीं दिवसभर व रविवारीं सकाळीं १० पर्यंत व संध्याकाळीं तीन ते ६ पर्यंत उघडें असतें. जयपूर हें राजपुताना माळवा रेलवे व

जयपूर स्टेट रेलवेचें जंक्शन मुंबईहून ६९९ मैल आहे. रेलवे भाडें ६ रु. १५ आणे लागतें.

## जाखलान.

हें जी. आय. पींचें स्टेशन झांशीचे नजीक आहे. येथून आठ मैलांवर देवघर येथें भूगर्भशास्त्रांतील राज्यास महत्त्वाचे असे अनेक प्राचीन अवशेष अद्यापि आढळतात. रस्ता चांगला नाहीं. यांत गुप्ताच्या वेळचें एक सुप्रसिद्ध देवालय व जैनांचीही कांहीं देवालयें आहेत. स्टेशनहून दोन मैलांवर जहाणपूर येथेंही जैनांचीं कांहीं पुरातन देवळें आहेत. जाखलान मुंबईहून ६३६ मैल आहे रेलवे भाडें ७ रु. ७ आणे लागतें.

## जळगांव.

हें जी. आय. पी. रेलवेचें जंक्शन स्टेशन आहे. येथून एक फांटा अमळनेरास जातो. स्टेशनापासून गांव मैलभर आहे. पश्चिमेच्या बाजूस गिरणा नदी वहाते. दोन मैलांवर मेहरणी नांवाचा मोठा तलाव आहे. जळगांव हें खानदेशांतील व्यापाराचें एक मुख्य व महत्वाचें ठिकाण आहे. रुईच्या व सुताच्या गिरण्या अनेक असून येथून अतोनात कापूस बाहेर जातो. येथून अजिंठ्याचीं लेणीं ३८ मैल असून रस्ता चांगला आहे. हीं लेणीं दोन हजार वर्षांपूर्वींचीं असावींत असें म्हणतात. जळगांव मुंबईहून २६१ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. १२ आणे लागतें.

## ज्वालामुखी.

पंजाबांत कांग्रा जिल्ह्यांत हें एक पुरातन स्थान आहे. लतनवाली देवी म्हणून एक देऊळ आहे. हें ज्या ठिकाणीं जमीनींतून नेहमीं ज्वाला निघते त्या जागेवर बांधलें आहे. या विषयींची आख्यायिका अशी आहे कीं ही ज्वाला दैत्यांचा राजा जालंधर याच्या मुखांतून निघते येथें मोठी यात्रा भरते. आसपास जवळ उष्ण पाण्याचे सहा झरे आहेत. पतियाळाच्या महाराजांनीं बांधलेली एक व इतर आठ अशा नऊ धर्मशाळा आहेत. ज्वालामुखीस जाण्यास नॉर्थ वेस्टर्न रेलवेचें पठाणकोट हें जवळचें स्टेशन आहे. पठाणकोट अमृतसरहून ६० मैल आहे. रेलवे भाडें १२ आणे ६ पै लागतें.

## जगन्नाथ.

अथवा ओढ्या जगन्नाथ असेंही म्हणतात. जगन्नाथास जाण्यास बंगाल नागपूर रेलवेच्या पुरी स्टेशनवर उतरावें लागतें. हें देवालय फारच प्रचंड आहे म्हणजे औरस चौरस लांबी रुंदी अनुक्रमें ६५२ व ६३० फूट आहे. भोंवतालीं आवार आहे. आवाराच्या आंत अपरिमित देवस्थानें आहेत त्यांत जगन्नाथ हें मुख्य आहे. ह्या देवालयाची प्रतिष्ठापना इ. स. ११७४ रांत अनंग भीमदेव याच्या हस्तें होऊन सन ११९८ त पूर्ण तें तयार झालें व त्यास एकंदर सात लाख पन्नास हजार रुपये खर्च आला असें म्हणतात. जगन्नाथाचें जें महाद्वार आहे त्याला सिंहद्वार असें म्हणतात कारण त्याचे दोन्ही बाजूस दोन दगडी प्रचंड सिंह आहेत. गर्भ देवालयांत जगन्नाथ, बलराम व त्यांची बहीण सुभद्रा अशा मूर्ती आहेत. येथें देवाचे अलंकार फारच अमोलिक आहेत. देवापुढें भोग अथवा प्रसाद जो ठेवतात त्यांतील कांहीं लोकांस वाटतात व बाकीचा देवालयांतच आनंदबाजार म्हणून जागा आहे तेथें विकावयास ठेवतात. हा भोग तयार करण्यास २०० स्वयंपाकी ठेवलेले आहेत. हा प्रसाद फार पवित्र मानला जातो. त्याला स्पर्शास्पर्श दोष नाहीं. ब्राह्मण व शूद्र तो सारख्याच प्रेमानें स्वीकारतात. रथजत्रा व स्नानजत्रा अशा दोन मोठ्या यात्रा भरतात. त्याप्रसंगीं एक लाख यात्रा भरते. पुरी स्टेशन कलकत्त्याहून ३११ मैल आहे रेलवे भाडें ४ रु १ आणा लागतें.

## जमखंडी.

हें पटवर्धनांचें संस्थान आहे. विजापुराहून बैलगाडीनें सरासरी १॥ दिवसाचा रस्ता म्हणजे ४० मैल आहे. बैलगाडीला अजमासें ६ रु. पडतात. वाटेनें छाया वगैरे नसून प्रवेश अगदीं रुक्ष आहे. विजापूर ओलांडल्यानंतर डोणनदी लागते. हिचें पाणी अगदीं खारट आहे. परंतु आसपासची जमीन फार पिकाऊ आहे. “ पिकेल डोण तर खाईल कोण ? ” अशी म्हण आहे. वाटेनें सारवाड, बबेश्वर हीं गांवें लागतात. जमखंडी संस्थान एकंदर ९ लक्षाचें आहे. शहर फार टुमदार आहे. महादेवाचें देवालय पाहाण्यासारखें आहे. येथून रामतीर्थ एक मैल आहे. संस्थानचा सर्व कारभार रामतीर्थासच चालतो. येथील पाहाण्यासारखें

मुख्य ठिकाण म्हणजे त्रिपुरसुंदरीचें देवालय. याचें सर्व काम संगमरवरी असून फारच मनोहर आहे. इकडे दगड तांबड्या रंगाचा आहे. यामुळें तेथील इमारतींना एक प्रकारची बहारीची शोभा आलेली आहे. होटगी जंक्शनहून विजापूरला जाण्यास रेलवे भाडें ९ आणे ३ पै लागतें.

## टेंकसी.

हा तालुक्याचा गांव त्रावणकोर संस्थानचे सरहद्दीवर चित्तर नदीचे कांठीं आहे. व कोर्ट आलमला जाण्यास हें स्टेशन आहे. कोर्ट आलम हें निसर्गशोभा व धबधबा यामुळें एक शांत व शीतळ असें एक ठिकाण आहे. कोर्ट आलम हें टेंकसीहून ३ मैल आहे. येथील १५ व्या शतकांत बांधलेलें महादेवाचें देवालय प्रेक्षणीय आहे. साळी व मसाल्याच्या जिनमा हे येथील मुख्य उत्पन्नाचे पदार्थ आहेत. टेंकसी मद्रासहून ४९१ मैल आहे. रेलवे भाडें ५ रु. ६ आणे लागतें.

## ठाणें.

हें जिल्ह्याचें ठिकाण मुंबईहून २१ मैल आहे. Kennery caves येथून महा मैलांवर आहेत. ठाण्याच्या खाडीनें साष्टी बेटास मुख्य भूप्रदेशापासून अलगलेलें—दुभागलें आहे. ठाण्याहून सुटल्यावर आगगाडी दोन बोगद्यांतून जाते. बोगद्याच्या एका बाजूस पारसिकची भूशलाका ( किनाऱ्यापुढें समुद्रांत गेलेलें टोंक ) व दुसऱ्या बाजूस डोंगरी प्रदेशाचा देखावा हीं पाहून प्रवाशास समाधान झाल्याखेरीज रहात नाहीं. या खाडींतून लहान लहान बोटी चालतात. स्टेशनच्या जवळच हाडाची गिरणी आहे. येथील अस्थिपर्वत पाहिला म्हणजे अंगावर शहारे येतात. मुंबईहून ठाण्यास रेलवेनें ४ आणे लागतात.

## ठाणेश्वर अथवा कुरुक्षेत्र.

दिल्लीच्या उत्तरेस ९६ मैल आहे. पूर्वी हें एक राजधानीचें शहर असून एकंदर विस्तार ११६७ मैल होता. ह्याचाही बहुतेक ऱ्हास झाला आहे. आर्यांची पहिली वसाहत होऊन हिंदुधर्माचा उगम प्रथम याच क्षेत्रांत झाल्यामुळें हें ठिकाण पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे. सांप्रत ही क्षेत्रमर्यादा ७० मैल आहे. या एवढ्या टापूंत एकंदर ३५२ देवस्थानें असून त्यांत ठाणेश्वर हें अग्रेसर आहे. ठाणेश्वरपासून मैलावर जें तळें

आहे त्याच्या कांठीं व मध्यभागीं एक अशीं अनेक देवालयें आहेत. कुरुक्षेत्र सरस्वती व धृषद्वती या दोन नद्यांच्यामध्यें हें असल्याचें संस्कृत ग्रंथांत वर्णिलें आहे. ठाणेश्वरास रेलवे झाल्यानंतर १८९४ च्या एप्रिलच्या ६ व्या तारखेस जें सूर्यग्रहण होतें त्यावेळीं जी पहिली मोठी यात्रा भरली होती ती ७५००० वर होती असा अंदाज आहे. ठाणेश्वर अंबालाहून २६ मैल आहे. रेलवे भाडें ६ आणे लागतें.

## डाकोर.

हें क्षेत्र बी. बी. सी. आय. रेलवेच्या आनंद स्टेशनपासून वीस मैल आहे. येथें एक विस्तीर्ण तलाव आहे तो पाहण्यासारखा आहे. याशिवाय येथील मुख्य ठिकाण म्हणजे श्रीकृष्णाचें देवालय होय. मूर्ति द्वारकेहून आणली आहे असें म्हणतात. देवालयाच्या इमारतीस एकंदर खर्च एक लाख रुपये लागलेले आहेत. देवाचें लांकडी सिंहासन सुंदर नकशीदार असून त्यावर गायकवाड सरकारांनीं लाख सव्वालाख रुपये खर्च करून तें सुवर्णानें मढवलें आहे. या क्षेत्रास फार लांबचे लोक येतात. आश्विन कार्तिकांत १ लाख यात्रा जमते. डाकोरास दहा धर्मशाळा आहेत. गांव स्टेशनापासून दीड मैल आहे. डाकोर बी. बी. सी. आय रेलवेच्या आनंद गोध्रा शाखेवर असून मुंबईहून २८९ मैल आहे. रेलवे भाडें ३ रु. १३ आणे ६ पै लागतें.

## डिंडिगल.

मद्रास इलाख्यांत मदुरा जिल्ह्यांत हा तालुक्याचा गांव आहे व हें साउथ इंडियन रेलवेचें स्टेशन आहे. तंबाकूच्या कारखान्याविषयीं हें ठिकाण अतीशय प्रसिद्ध आहे. येथील जुना किल्ला एका उंच टेंकाडावर आहे. एका युरोपियन कंपनीचा सिगरेटचा कारखाना आहे. येथून ३६ मैलांवर “ पळणी अंदावर ” ह्मणून एक स्थान आहे. कापूस, एरंडी, कांदे, सिगारेट, बांबू व इमारती लांकूड हा माल मुख्यत्वेंकरून येथून बाहेर जातो. कातडें कमावण्याची साल, ओलीं कातडी व मीठ हे पदार्थ येतात. लोखंडी व ब्रांझचें काम चागलें होतें. कातडें कमावण्याचे १० कारखाने आहेत. पलनी अंदावरकडे जाण्यास स्टेशनवर तांगे व बैलगाड्या मिळतात. पलनी अंदावरास जाणारांनीं अम्मयानायकनूर स्टेशनवर उतरावें.

येथेंही गाड्या मिळतात. हें स्टेशन मद्रासहून ३३२ मैल आहे. रेलवे भाडें ३ रु. ९ आणे लागतें.

## डेरानानक.

पंजाबांत गुरुदासपूर जिल्ह्यांत बटाला तालुक्यांत रावी नदीचे कांठीं हा गांव आहे. सध्यांचा जो गांव आहे याच्या समोरच्या बाजूस पोखोक म्हणून एक खेडें होतें तेथें शीखांचा पहिला गुरु बाबा नानक हा रहात असे व त्यानें येथेंच देह ठेवला. त्याचे वंशजही नदीच्या पाण्यानें तो गांव वाहून जाईपर्यंत येथेंच रहात असत. तें ठिकाण वाहून गेल्यामुळें नदी ओलांडून त्यांनीं पलीकडे नवीन गांव वसविला व आपल्या पवित्र पूर्वजाचें नांव दिलें. बाबा नानकाचें एक सुंदर देवालय येथें आहे. तालिसाहेब म्हणून दुसरें एक देऊळ आहे. बटाला हें नॉर्थ वेस्टर्न रेलवेचें स्टेशन अमृतसरहून २४ मैल आहे. रेलवेभाडें ४ आणे ६ पै लागतें. बटालाहून डेरानानकास जाण्यास एक्के मिळतात.

## तंजावर.

मद्रास इलाख्यांत तांजोर हें जिल्ह्याचें ठिकाण असून स्टेशन आहे. तंजावरच्या आसपासचा मुलूख फार सुपीक आहे. प्राचीन काळापासून राजकारणांत, भाषाविषयक अगर धार्मिक वगैरे कोणत्याही बाबतींत तांजोर शहर हें दक्षिणेंतील एक प्रधान स्थान आहे. येथील कलाकौशल्याचीं कामें अप्रतिम आहेत, येथील भव्य व विस्तीर्ण महादेवाचें देवालय सर्व भरतखंडांत प्रसिद्ध आहे. व तें इ. स. १३३० चे सुमारास कांजीवरमच्या एका राजानें बांधलें आहे. येथील नंदी अतिशय प्रचंड आहे. त्याची लांबी सोळा फूट असून उंची बारा फूट आहे. त्याला रोज तेल माखतात त्यामुळें तो गुळगुळीत व चकचकीत झाला आहे. पलीकडे सुब्रह्मण्याचें देवालयही फारच मनोरम आहे. रेशमी वस्त्रें, जवाहीर, तांब्याचे जिन्नस व इतर कलाकौशल्याच्या कामांविषयीं तांजोर हें नामांकित आहे. येथें एकंदर ९ धर्मशाळा व ५० खाणावळी आहेत. तांजोर मद्रासहून २२० मैल आहे. रेलवेभाडें २ रु. ७ आ. लागतें.

## तिरुपती.

हें श्रीव्यंकटेशाचें स्थान मद्रासहून ९० मैल आहे. तिरुपतीस जी

पर्वतांची रांग आहे, तिच्या शेषाचलम् या पर्वतशिखरावर हें श्रीव्यंकटे-शांचें स्थान आहे. हे सर्व पर्वत मेरुपर्वताचेच भाग आहेत असें म्हण-तात. एकदां शेष व वायु यांच्यामध्यें मोठा कोण म्हणून स्पर्धा लागली, तेव्हां शेषानें मेरुपर्वताचें एक शिखर आपल्या डोक्यावर उचलून घेतलें. पण वायूनें इतकें जगडव्याळ स्वरूप धारण केलें कीं, शेषाचे शिरा-वरील पर्वत सहज लीलेनें खालीं आले, ते हेच पर्वत होत. येथें एकंदर ३१ तीर्थें आहेत. त्यांत स्वामी पुष्करणी हें सर्वांत मोठें आहे. श्रीव्येंकटेशाची मूर्ति चतुर्भुज असून फारच विस्तीर्ण म्हणजे सात फूट उंच आहे. शंख, चक्र, गदा, पद्म यांनीं युक्त असें ध्यान फारच मनोरम आहे. ब्रह्मउत्सवम् म्हणून दसऱ्यास मोठा उत्सव होतो. तिरुपती हें स्टेशन मद्रासहून २६६ मैल आहे. रेलवेभाडें ३ रु. लागतें. चुडे, नकली डागीने वगैरे इकडे पुष्कळ तयार होतात.

## तिरुपवनम्.

हें एक यात्रेचें ठिकाण दक्षिण हिंदुस्थानांत शिवगंगा जमीनदारींत आहे. स्टेशनहून थोड्या अंतरावर महादेवाचें एक स्थान आहे. रामेश्वराहून परत येतांना लोक येथें पुष्कळ उतरतात. रथोत्सव मोठा थाटाचा होतो. साळ, नारळ, सुपारी व केळीं हे येथील मुख्य उत्पन्नाचे पदार्थ आहेत. एक धर्मशाळा आहे. तिरुपवनम् हे साउथ इंडियन रेलवेचें स्टेशन मद्रा-सहून ३६१ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १ आणा आहे.

## तुळजापूर.

हें पुरातन क्षेत्र सोलापुराहून २४ मैलांवर निजामचे हद्दींत आहे. वाटेंत तुळजापूरचे जवळच सिंदफळ हा गांव लागतो. येथें मुद्गलेश्वराचें देवालय आहे. मुद्गलेश्वर या ऋषीस देवीनें आपला पिता मानला होता, त्यामुळें सिंदफळ हें देवीचें माहेर असें समजतात. येथील श्रीजगदंबेचें देवालय फारच विस्तीर्ण व पाहाण्यासारखें आहे. गर्भ-देवालयास जाण्यास बऱ्याच पायऱ्या उतरून खालीं जावें लागतें. कांहीं पायऱ्या उतरल्यानं-तर कल्लोळ व गायमुख हीं दोन तीर्थें आहेत. कल्लोळांत स्नान करण्यास ब्राह्मणेतरांस ४ आणे कर आहे. समोर होमशाला आहे. अश्विन वद्य ९

स मोठा होम होत असतो. या ठिकाणीं दरवर्षी नगरच्या तेल्याची पालखी येते. याविषयींची दंतकथा अशी आहे कीं, या घराण्याच्या मूळ पुरुषाला देवाचा वर होता. तो असा कीं, त्यानें पालखी घेऊन निघतांच त्याचें घर जळून जावयाचें व तो परत जाईपर्यंत तें पुन्हां नवें कोरें होत असे. ही चाल अद्यापि चालू आहे. सांप्रत तो एक पर्णकुटिका तयार करून त्याला अग्नि लावून देऊन येत असतो. पालखीचा खालचा सांटा नवमीच्या दिवशीं रात्रीं होमांत टाकतात व दांडी मात्र परत न्यावी लागते. सभामंडपाच्या दारावर एका चांदीच्या पत्र्यावर एक संस्कृत स्तोत्र लिहिलेलें आहे. शेवटीं हस्ताक्षर अनंत पाठक वारकरी शके १७७९ श्रावण कृष्ण ९ शुक्रवार प्रमादीनाम संवसरे असा उल्लेख आहे. येथून देवीचें दर्शन होतें. ध्यान फारच मनोहर आहे. गर्दी होऊं नये म्हणून दर्शन घेतलेल्या लोकांस दक्षिण दरवाजानें बाहेर सोडतात. या दरवाजावर देवासच्या महाराजांच्या बंधूनीं केलेलें स्तोत्र चांदीच्या पत्र्यावर लिहिलेलें आहे. त्यांतील ४।५ श्लोक आमच्या प्रेमळ व रसिक वाचकांसाठीं खालीं देत आहों. ते असेः—झाला महापुरुष या परमावर वंशीं ॥ नामाभिधान बरवें जगदेव त्यासी ॥ कीं तो तुझाच जननी निजबाळ होता ॥ तूझे कृपें सकळ वैभव येत हातां ॥ * * * * माझे पितामहा पितादि याच वंशीं ॥ झाले मीही जन्मलों पदसेवनासी ॥ पुरवून हेतु मनिंचे भवबंध तोडीं ॥ दासाभिमान सहसा जननी न सोडी ॥ देवास नाम नगरी करि वास देवी ॥ ही राजधानी बहुपुण्य पवित्र ठावी ॥ तेथील भूप दुसरा स्तवितों मी माते ॥ दे सौख्यराशी तव भक्ति सदैव मातें ॥ * * * * * शुभं चैत्र शुक्ल १० शुक्रवारे तुळजापुरे महापूजावत्सरे श्रीभगवत्यै समर्पितमिदं स्तोत्रं शकाब्दाः १८०३ संवत् १९३८. देवालयांतच देवीचें संस्थान म्हणून कचेरी आहे. या ठिकाणीं देवालयाचा जमाखर्च राहतो. देवालयाच्या पश्चिमेस अर्ध्या मैलावर भारतीबुवांचा मठ आहे. येथें यात्रेकरूंवर "खुंटाफळी" म्हणून दरगाडीमागें १। रु. कर आहे. गांवांत कुंकवाचा मोठा कारखाना आहे. सोलापुराहून बैल गाड्या व तांगे मिळतात. बैलगाडीला जातां येतां अजमासें पांच सहा रुपये पडतात. पुण्याहून सोलापूरला रेलवेभाडें २ रु. लागतें.

## तघलकाबाद.

हें शहर दिल्लीजवळ आहे. हें शहर व येथील किल्ला तघलक घराण्याचा मूळ संपादक घियासुद्दीन तघलक या बादशहानें इ. स. १३२१ व २३ यांचे दरम्यान बांधिला आहे. कुतुबमिनार ही सुप्रसिद्ध इमारत येथून जवळ आहे. तघलकाबादहून पांच मैलांवर चव्हाण वंशाचा शेवटचा राजा पृथ्वीराज याची राजधानी तें जुनें दिल्ली शहर त्याचे अवशेष आहेत. कुतुबमिनार, कुतुबमशीद, सुप्रसिद्ध लोहस्तंभ व अलाईदरवाजा हीं येथें जरूर पहाण्यासारखीं ठिकाणें आहेत. तघलकाबाद हें स्टेशनही आहे व तें मुंबईहून ९४९ मैल आहे. रेलवेभाडें ९ रु. ७ आणे लागतें.

## तुंगभद्रा.

हें स्टेशन रायचूरचे जवळ आहे. तुंगभद्रा नदी स्टेशनचे जवळच आहे. रामेश्वरास जाणारे येथें स्नानास हटकून उतरतातच. स्टेशनवर मोठी धर्मशाळा आहे. येथून नऊ मैलांवर मंचाली म्हणून क्षेत्र आहे. तेथें राघवेंद्रस्वामींचें स्थान आहे. मंचालीला मंत्रालयम् असेंही म्हणतात. स्टेशनहून गांवांत जाण्यास बैलगाड्या मिळतात. तुंगभद्रा हें स्टेशन मद्रासहून ३३४ मैल आहे व रेलवेभाडें ३ रु. ८ आणे लागतें.

## त्रिचनापल्ली.

मद्रास इलाख्यांत कावेरी नदीचे कांठीं हें एक मोठें व्यापाराचें शहर आहे. त्रिचनापल्लीस हैदर व टिपू यांचे कारकीर्दींत अनेक वेळां वेढे पडल्याविषयीं इतिहासांत प्रसिद्ध आहे. एका उंच टेंकाडावर महादेवाचें व गणपतीचें देवालय आहे. शहरची लोकवस्ती जवळ जवळ एक लाख असून इलाख्यांत मद्रासचे खालोखाल हें एक महत्वाचें शहर आहे. हें शहर चिरूटांविषयीं प्रसिद्ध आहे. स्टेशनवर ब्राह्मणाची खाणावळ आहे. त्रिचनापल्ली हें जंक्शन स्टेशन मद्रासहून २१९ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. १३ आणे लागतें.

## त्र्यंबकेश्वर.

श्रीक्षेत्र त्र्यंबक हें पवित्र स्थान नासिकहून २० मैलांवर आहे. त्र्यंबकेश्वर हा सह्याद्रीचाच एक भाग आहे. गोदावरी नदीचा उगम येथेंच असल्यामुळें हें स्थान अत्यंत पवित्र व रमणीय आहे. त्रिंबक हें बारा

ज्योतिर्लिंगांपैकीं एक महादेवाचें स्थान आहे. त्र्यंबक गांव फारसा मोठा नाहीं. गांवाजवळच्या एका टेंकडीवर प्राचीनकाळचा एक मजबूत किल्ला आहे. त्र्यंबकेश्वराचें लिंग महादेवाच्या इतर लिंगांप्रमाणें नसून पाण्याच्या धारेंत निरनिराळ्या तीन मुद्रारूप आकृति मात्र आहेत. त्रिंबकास कुशावर्त, कनखलतीर्थ व चक्रतीर्थ अशीं तीर्थें आहेत. गंगाद्वारे कुशावर्ते बिल्वके नीलपर्वते । स्नात्वा कनखले तीर्थे पुनर्जन्म न विद्यते ॥ १ ॥ असें याचें माहात्म्य आहे. सिंहस्थास या ठिकाणचें माहात्म्य विशेष आहे. त्रिंबकास एकंदर १२ धर्मशाळा आहेत. पण त्यांतलि बहुतेक आपापल्या जातीपुरत्या आहेत. नासिक मुंबईहून ११७ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. ४ आणे.

## देवबंद.

पंजाबांत सहारणपूर जिल्ह्यांत हा गांव आहे. गांवापासून अर्ध्या मैलावर देवीकुंड म्हणून लहानसें तीर्थ आहे. त्याच्या कांठीं देवळें, घाट व सती स्त्रियांचीं स्मारकें यांची एक मालिकाच लागली आहे. हें एक पुरातन ठिकाण आहे. अद्यापिही जवळच्या जंगलांत देवीचें एक देऊळ आहे. तेथें धार्मिक चर्चा होत असते. स्टेशनापासून गांव दीड मैल आहे, एक्के मिळतात, देवबंद लाहोर पासून २५९ मैल आहे. रेलवे भाडें ३ रु. ६ पै लागतें.

## देवगड.

संताळ परगण्यांतील हा तालुक्याचा गांव आहे. या ठिकाणीं महादेवाचीं २२ देवालयें आहेत. त्यांपैकीं वैद्यनाथ म्हणून सर्वांत जुनें आहे. तें महादेवाचे अति प्राचीन अशा बारा लिंगांपैकीं एक आहे असें म्हणतात. लोकसंख्या सुमारें आठ हजारांवर आहे. भाद्रपद पौर्णिमेस व शिवरात्रीस मोठे उत्सव होतात. दोन धर्मशाळा आहेत. खेरीज सरकार यात्रेकरतां तात्पुरत्या झोंपड्या उभारतें. देवगड कलकत्याहून २०५ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. ८ आणे लागतें.

## दंतन.

हें बेंगाल नागपूर रेलवेचें स्टेशन असून बंगाल्यांतील मिदनापूर जिल्ह्यांत हा एक मोठा गांव आहे. शामलेश्वर म्हणून महादेवाचें देऊळ

आहे. हें भोज राजानें बांधलें आहे असें कळतें. परंतु मूळ हकीकत अनुपलब्ध आहे. विद्याधर आणि शशशंकर हे दोन तलाव मात्र इतिहास-प्रसिद्ध आहेत. पहिला राजा तेलिंग मुकंददेव याचा प्रधान विद्याधर याच्या हुकुमावरून खोदला आहे. दुसरा राजा शशशंकरदेव यांनीं बांधला आहे. आंतून हे दोन्हीं तलाव एकमेकांशीं जोडले आहेत असें म्हणतात. गांव स्टेशनापासून दीड मैल आहे. बैलगाड्या मिळतात. दंतन कलकत्त्याहून १०४ मैल आहे. रेलवेभाडें. १ रु. ५ आणे ९ पै लागतें.

## दोड्डकुरुगाडे.

या गांवाजवळ नदीचे कांठीं एक अश्वत्थवृक्ष आहे. याला विदुर अश्वथम् असें म्हणतात. हें झाड सुमारें ४०००वर्षांचें जुनें आहे व तें विदुरानें लावलें आहे असें म्हणतात. या ठिकाणीं सेवा केल्यास सर्व आधिव्याधि नाहींशा होऊन सर्व मनकामना पूर्ण होतात. म्हणून येथें यात्रेस पुष्कळ लोक येतात. स्टेशनहून सुमारें एक मैलावर दोन धर्मशाळा आहेत. दोड्डकुरुगाडे बिझवाडाहून ४०२ मैल आहे. रेलवे भाडें ४ रु. ३ आणे ६ पै लागतें.

## देवळवाडा.

वऱ्हाडांत वर्धा जिल्ह्यांत अर्वी तहासिलींत वर्धा नदीचे कांठीं हा गांव आहे. येथें देवी रुक्मिणीचें सुंदर देवालय आहे. येथें मोठी यात्रा भरते. यात्रेस पुणें, नासिक, नागपूर, जबलपूर वगैरे प्रांताचें हजारों लोक येतात. भागवताच्या दशम स्कंधांत वर्णिलेलें कुंडिणपुर शहर समोर वर्धेच्या दुसऱ्या बाजूस आहे. जवळचें रेलवे स्टेशन म्हणजे अर्वीरोड (एम्. एस्. एम्.) हें पुण्याहून ९७मैल आहे. रेलवेभाडें पुणें ते अर्वीरोड १ रु ४ आणे ६ पै लागतें.

## द्वारका.

हें पवित्र क्षेत्र काठेवाड द्वीपकल्पाच्या अगदीं पश्चिम टोंकास आहे. हें शहर भगवान् श्रीकृष्णानें स्वतः निर्मिलें आहे, एवढें सांगितलें म्हणजे पुरे. त्याच्या सौंदर्याविषयीं निराळें लिहिण्याचें कारण नाहीं. येथें श्रीकृष्णाचें सुंदर देवालय आहे. हें भव्य देवालय एका रात्रींत बांधलें आहे असें म्हणतात. सभामंडप व एकंदर देवालय फारच मनोरम व अप्रतिम आहे. प्रत्येकानें आपल्या हयातींत एकदां तरी जाऊन पाहून यावें. बेदी बंदराहून द्वारकेस जहाजांतून जावें लागतें. बेदी बंदर हें (बी.जी.जे.पी रेल-

वेच्या) जामनगर स्टेशनहून चार मैल आहे जामनगर भावनगरहून २०३ मैल आहे. रेल्वेभाडें ३ रु. लागतें.

## दिल्ली.

हें शहर फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. सांप्रतचें दिल्ली शहर जरी शहाजहान बादशहानें इ. स. १६३१ त नवीन वसविलें आहे. तरी आसमंतातच्या प्रदेशांतच पांडवांची राजधानी हस्तिनापूर हें शहर होतें. भरतखंडांत निरनिराळ्या वेळीं जी निरनिराळी राजसत्ता स्थापित झाली व ती स्थापन होण्यापूर्वीं जें घोर रणकंदन व राजकरण झालें तें सर्व दिल्लीसच होय. दिल्ली ही मोंगलसाम्राज्याची राजधानी असल्यामुळें गतकालच्या अनेक प्रेक्षणीय चिजा या ठिकाणीं आहेत. कुतुबमिनार दिल्लीहून १२ मैल आहे. कुतुबमिनार हा एक स्मारक स्तंभ असून याची उंची २३८ फूट आहे. कुतुबमिनार येथें " फेरोझशहाची लाथ" म्हणून लोखंड, तांबें व जस्त या तीन धातूंचा केलेला एक खांब आहे. जुन्या राजवाड्यांत दिवाण-इ-खास म्हणून पांढऱ्या संगमरवरी दगडाची सुंदर इमारत आहे. नादिरशहानें इ.स. १७३९ त नेलेलें मयुरांकितसिंहासन याच ठिकाणीं होतें. जवळच मोतीमशीद आहे. खेरीज जम्मा मशीद म्हणून उत्कृष्ट इमारत आहे. बादशहा हुमायूनची कबर येथून दोन मैल आहे. याखेरीज खुशरू कवीची कबर, काला मशीद, अशीं शेंकडों ठिकाणें आहेत. शहराला यमुनेचा कालवा आणला आहे. चांदनी चौक हा दिल्लीचा मोठा रस्ता आहे. जरीकांठी कलाबुतीविषयीं दिल्ली शहर प्रसिद्ध आहे. स्टेशनवर धर्मशाळा आहे. दिल्लीस चार रेल्वेनें जातां येतें. मुंबईहून अंतर ९५७ मैल असून रेल्वेभाडें ९ रु. १५ आ. लागतें.

## नागपूर.

हें मध्यप्रांताचें मुख्य शहर आहे. येथें कमिशनर राहतो. भोसल्यांचें रुक्मिणीमंदिर प्रेक्षणीय आहे. सभामंडपाचें लांकडी काम व शिखराचें नक्षीकाम अगदीं बिनमोल आहे. हें पाहिल्यानंतर पहाणाराच्या तोंडून 'धन्य' हीं अक्षरें निघाल्याशिवाय रहातच नाहींत. लगतच भोसल्यांचे वाडे आहेत. महाराजबाग व तुळशीबाग हीं पहाण्यासारखीं आहेत. महाराजबागेंत प्राणिसंग्रह आहे. त्यांत पांढरे वाघ दोन आहेत.

त्यांपैकीं एक आलेल्या प्रवाशास 'रोटी खाया' म्हणून मोठा मजेचा प्रश्न करतो. जणू काय अनोळखी मनुष्याची शहराच्या ठिकाणीं होणारी अडचण जाणूनच तो असें विचारतो कीं काय असा भास होतो. सिताबर्डी हा मजबूत किल्ला इ. स. १८१८ त बांधला आहे. नागपूरास पदार्थसंग्रहालय व लायब्ररी हीं प्रेक्षणीय आहेत. स्टेशनहून शहरांत जातांना सडक अतीशय रुंद असून सडकेच्या दोन्ही बाजूस अनेक गिरण्या व मध्य भागीं तलाव असल्यामुळें देखावा फार मनोहर दिसतो. एंप्रेस मिल व स्वदेशी मिल या गिरण्या नामांकित आहेत. नागपूरचीं संत्रीं जगजाहीर असून तीं मुंबई, हैद्राबाद, (दक्षिण) वगैरेकडे जातात. छतीसगड, संबळपूर वगैरे आसपासच्या प्रांतांतून आलेला जंगलाचा मालही नागपुराहून पुष्कळ रवाना होतो. नागपूर हें जंक्शन असून मुंबईहून ५२० मैल आहें. रेलवेभाडें ९ रु. ७ आणे लागतें.

## नासिक.

शहर स्टेशनपासून ५ मैल आहे. स्टेशनहून शहराला ट्रामवे आहे. ट्रामवेचा माणशीं २ आणे दर आहे. यात्रेकरूवर बारमहा माणशीं ४ आणे कर आहे. कर घेऊन गांवांत सोडतात. उगम जवळ असल्यामुळें गोदेचें पात्र या ठिकाणीं अरुंद आहे. नदींत कुंडें बांधून काढलीं आहेत. अलीकडे नासिक व पलीकडे पंचवटी अशी दोन्हींकडे वस्ती असल्यामुळें नदीचा देखावा फारच रमणीय दिसतो. नदींतील कुंडांस नीलकंठेश्वर कुंड, गोऱ्या रामाचें कुंड, धनुष्य कुंड व लक्ष्मण कुंड अशीं नांवें आहेत. गोऱ्या रामाचें कुंड जें आहे तेथेंच रामानें दशरथाचें उत्तरकार्य केलें असें सांगतात. अलीकडचे कांठाला लक्ष्मीनारायण, मुरलीधर, वगैरे अप्रतिम देवालयें लागतात. मुरलीधराचें देवालय फारच सुशोभित आहे. व तें कुवलबाई मुंबई इनें पतीचे स्मरणार्थ मार्गशीर्ष शु० ६ संवत् १९५२ मध्यें बांधलें आहे. मुरलीधराचें ध्यान फारच मनोहर आहे. जवळच देवमामलेदार यांची समाधी आहे. पलीकडच्या कांठास सरदार नारोशंकर यांचें महादेवाचें देवालय आहे. देवालयावरील प्रचंड घंटा नारोशंकर यांनीं दिल्लीहून आणली असें म्हणतात. साध्वी अहल्याबाईची धर्मशाळा, गंगामंदिर, कपालेश्वर हीं ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत. काळ्या रामाचें

देवालय हें या क्षेत्रांतलें मुख्य स्थान आहे. येथें पांच वटवृक्ष आहेत. म्हणून पंचवटी म्हणतात. श्रीरामांनीं वनवासांत पंचवटीस याच ठिकाणीं वास केला असें म्हणतात. श्रीरामाचें मनोहर ध्यान शब्दांनीं वर्णन करणें अशक्य आहे. जवळच सीतागुंफा( म्हणजे सुवर्ण मृगाचा पाठलाग करण्यास जातेवेळीं सीतेस ठेवलेलें ठिकाण ) आहे. तपोवन पंचवटीहून दोन मैल आहे. तपोवन बैराग्यांच्या मालकीचें आहे. अद्यापि या वनांत अनेक बैरागी वगैरे तप करीत असलेले दृष्टीस पडतात. तपोवनांतही दोन तीन मोठीं देवालयें आहेत. राम ज्या ठिकाणीं ध्यानस्थ बसत असत तो एक विस्तीर्ण वटवृक्ष येथें आहे. खालीं गोदेचे पात्रांत शूर्पणखेस मारलेली जागा, कपिलमुनी, ब्रह्मयोनी व शिवयोनी वगैरे अष्ट तीर्थें, नदी-वरील एकनाथ महाराजांची समाधी हीं ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत. नासिकास भाजीपाला व द्राक्षें चांगलीं मिळतात. तांब्याच्या व पितळेच्या भांड्यांविषयीं तर नासिक सुप्रसिद्धच आहे. नासिक मुंबईहून ११७ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. ४ आणे लागतें.

## नाथद्वारा.

हें उदेपूर संस्थानांत उदेपुरापासून २२ मैल आहे. हें एक वैष्णवांचें प्रसिद्ध स्थान आहे. मथुरेस जी कृष्णाची मूर्ती मूळ होती ती येथें आणून स्थापिली आहे. इ०स० १६७१ चे सुमारास उदेपूरचा राणा राजसिंग यानें ही मूर्ती मथुरेहून मोठ्या थाटानें मेवाडांत आणली. उदेपू-रच्या हद्दींत आल्यावर दिलवारच्या जहागिरींत रथाचें चाक जमिनीस चिटकून राहिलें. तेव्हा दिलवाराच्या जहागिरदारानें याच ठिकाणीं स्थापना व्हावी अशी देवाची इच्छा दिसते असें सांगितलें. तेव्हां त्याच ठिकाणीं मग स्थापना करून भव्य देवालय बांधलें. व त्याभोंवतीं नाथद्वाराचें गांव वसलें. बी. बी. सी. आय रेलवेचें मुळी हें नाथद्वरास जवळचें स्टेशन आहे. मुळी हें स्टेशन मुंबईहून ४०३ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ५आ. पै ९ लागतें.

## नवसरी.

हें शहर गुजराथेंत बडोद्याजवळ आहे. हें पारशी लोकांचें एक पवित्र ठिकाण आहे. येथें पारशी लोकांच्या अग्यारी ह्मणजे अग्नीचीं देवालयें पुष्कळ आहेत. या ठिकाणीं चोहोकडचे पारशी लोक येतात. स्टेशन जवळ धर्मशाळा

आहे. नवसरी मुंबईहून बी. बी. सी. आय रेलवेनें १४९ मैल आहे. रेलवे भाडें १ रु. १२ आणे लागते.

## निदवंदा.

हें शिवगंगास जाण्यास जवळचें स्टेशन आहे. शिवगंगा हा एक पवित्र व सुप्रसिद्ध गोपुच्छाकार पर्वत आहे. पर्वतावर पुष्कळ देवालयें असून टेंकडीच्या एका भेगेंतून पाताळगंगा म्हणून तीर्थ वाहतें. हा प्रवाह कोठून येतो याचा तर्क चालत नाहीं. शिखरावर दोन दगडी खांब आहेत. दक्षिणायन लागल्या दिवशीं त्यांतून पाण्याचा पाझर फुटतो. हा एक येथें चमत्कार आहे. मकरसंक्रांतीस मोठी यात्रा भरते. स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. पर्वतावर दोन धर्मशाळा आहेत. निदवंदा पुण्याहून ५९७ मैल आहे. रेलवेभाडें ७ रु. १२ आणे ६ पै लागतें.

## निझामउद्दीन.

हें जी. आय. पी. चें स्टेशन दिल्लीजवळ आहे. हें नांव पडण्याचें कारण निझामउद्दीन अवलिया म्हणून मुसलमानांचा एक पवित्र दर्गा येथें आहे. येथून जवळच कुतुबमिनार म्हणून सुप्रसिद्ध इमारत आहे. तिच्या जवळ खोजा कुतबुद्दीनचा दर्गा आहे. निझामउद्दीनचे आसपास अनेक जुने राजवाडे, किल्ले व मशिदी आहेत. मोगल साम्राज्याचा अर्ध चंद्र कित्येक दिवस येथें प्रकाशत असल्यामुळें या ठिकाणीं जुन्या अनेक चिजा पाहण्यासारख्या आहेत. महाभारतांत इंद्रप्रस्थ म्हणून ज्याचा उल्लेख आहे त्या ठिकाणीं हल्लीं हुमायून व शीरशहा यांच्या किल्ल्याच्या भिंती व अवशेष आहेत. हुमायून बादशहाचें संगमरवरी दगडाचें थडगें फारच प्रेक्षणीय असून हल्लींही त्याची निगा चांगली आहे. निझामउद्दीन अवलिया हा दर्गा सर्व हिंदुस्थांत अति पवित्र आहे. या दर्ग्यांत एक तलाव, एक सुंदर मशीद व अवलिया आणि राजघराण्यांतील कांहींचीं थडगीं आहेत. दोन मैलांवर सफदारजंग म्हणून एक सुंदर थडगें आहे. येथील अनेक इमारती प्रेक्षणीय असून त्या सर्वांविषयीं वेगळें लिहिणें कठीण आहे. निझामउद्दीन मुंबईहून ९५२ मैल व दिल्लीहून ५ मैल आहे. रेलवेभाडें अनुक्रमें ९ रु. १५ आणे व 1 आणा ३ पै लागतें.

## पुणें.

हें महाराष्ट्रातलें इतिहासप्रसिद्ध शहर आहे. श्री छत्रपती शाहू महाराजांचे वेळीं मराठी साम्राज्यसत्ता पेशव्यांकडे आली तेव्हां पेशव्यांनीं आपली गादी पुण्यास स्थापिली. मराठी साम्राज्याच्या वाढत्या काळांत पुणें म्हणजे सर्व मराठा सरदारांचें केंद्रस्थान असून राजकारणांतल्या अनेक उलाढाली पुण्यास होत असत. या अवधींत सुखाचा लाभ पुणें शहरास बराच कालपर्यंत मिळाला आहे. पुणें हें सदर्न मराठा व जी. आय. पी. रेलवेचें जंकशन असून ,हुबळीधारवाडकडे जाणारांस या ठिकाणीं गाडी बदलावी लागते. पुण्याची हवा उत्कृष्ट असून शहरची स्वच्छता व हौदामुळें पाण्याची असलेली सोय या दृष्टीनें पहातां पुणें हें एक चांगलें आरोग्यवर्धक शहर आहे. वर्षास पुण्यास सरासरी २९ इंच पाऊस पडतो. पावसाळ्यांत मुंबई सरकारचें ठाणें पुण्यास असतें. पुणें हें मुळा नदीच्या कांठीं असून मुळा व मुठा यांचा संगमही जवळच आहे. पुण्यास पेशव्यांच्या कारकीर्दींतील पाहण्यासारखें मुख्य ठिकाण म्हणजे पर्वतीचें देवालय. हें त्याच नांवाच्या एका टेकडीवर आहे. टेकडीच्या पायथ्याशीं हिराबाग म्हणून सुंदर बाग आहे या ठिकाणीं पूर्वी पेशव्यांचे विश्रांतिगृह होतें असें म्हणतात. खेरीज शहरांतील प्रेक्षणीय ठिकाणें म्हणजे डेक्कन व फर्ग्युसन कॉलेज, कौन्सिल हॉल, येरवड्याचा तुरुंग, सासून हॉस्पिटल वगैरे आहेत. पुण्याहून ४ मैलांवर असलेलें खडकी हें मुंबई इलाख्यांतील लष्करचें एक मुख्य ठाणें आहे. बंदुकीची दारू वगैरे तयार करण्याचे मोठमोठे कारखाने स्टेशनहून सुमारें चार साडेचार मैलांवर आहेत. पुण्याहून दहा मैलांवर खडकवासल्यास पाण्याची मोठी गिरणी आहे. येथूनच शहरास अमूप पाण्याचा पुरवठा होतो. पुण्याहून अनुक्रमें दहा व वीस मैलांवर सिंहगड आणि पुरंदर हे दोन इतिहासप्रसिद्ध किल्ले आहेत. पुणें व मुंबई यांजमध्यें अंतर ११९ मैल आहे. रेलवे भाडें १ रु. ८ आणे लागतें.

## पंढरपूर.

हें श्री पांडुरंगाचें स्थान सोलापूर जिल्ह्यांत आहे. येथें आषाढी व कार्तिकी अशा दोन मोठ्या यात्रा भरत असून या प्रसंगीं हजारों भाविकांची

श्रीचे दर्शनास जी दाटी जमते तिचें वर्णन करणें या ठिकाणीं केवळ अशक्य आहे. पंढरीक्षेत्रास पूर्वी दिंडीरवन असें म्हणत असत. श्रीकृष्ण रुक्मिणीचे शोधार्थ येथें आल्यावर बौद्धावतार धारण करून पांडुरंग स्वरूप धारण करून भक्तराज पुंडलिकास त्यांनीं दर्शन दिलें व तेव्हांपासून हें ठिकाण पंढरिक्षेत्र अगर पंढरपूर म्हणून प्रसिद्धीस आलें. पंढरपूर हें वारकरी सांप्रदायाचें आदिपीठ आहे. नामदेव, तुकाराम इत्यादि संतांनीं पांडुरंगाचे गुण गातांना पंढरीला भूवैकुंठ म्हटलें आहे तें यथार्थ आहे. पंढरपुरास भीमानदीला चंद्रभागा हें नांव आहे. चंद्रभागेंतच पुंडलिकाचें देवालय आहे. पुंडलिकाचें दर्शन आधीं घ्यावयाचें एवढेंच नाहीं पण पांडुरंगाचे आधीं पुंडलिकाचें नांव घ्यावयाचें असा पुंडलिकास वर आहे. म्हणून 'पुंडलिक वरदे हरि विठ्ठल' असें म्हणतात. पांडुरंगाच्या पायरीलाच नामदेवाची समाधी आहे. खेरीज शहरांत अनेक देवालयें आहेत. त्यांचा नुसता उल्लेख करण्यास देखील येथें स्थलावकाश नाहीं. चंद्रभागेचें स्नान व पुंडलिकाचें दर्शन झाल्यावर जीवांची ऐहिक यात्रा कां सुखकर होणार नाहीं? पंढरपूर बार्शीरोड (कुर्डूवाडीहून) बार्शी लाईट रेलवेनें ३० मैल असून रेलवेभाडें ७ आणे ६ पै लागतें.

## पालिठाणा.

हें पालिठाणा संस्थानचें मुख्य शहर काठेवाड द्वीपकल्पाचे पूर्वेस आहे. जैनांचे जे पांच पवित्र पर्वत आहेत. त्यांतील सत्रंजय हा येथून जवळ आहे. या पर्वताचें शिखर अनेक सुंदर देवालयांनीं गजबजून गेलें आहे. त्यांत आदिनाथ, कुमारपाळ, विमलाश, चार्जमुख व संप्रतिराजा हे प्रमुख आहेत. चार्जमुख हें अतिशय उंच असल्यामुळें सुमोर २५ मैलपर्यंत दिसतें. सर्व धार्मिक विधी आटोपल्यावर यात्रेकरूंनीं खालीं गेलेंच पाहिजे. पर्वतावर अन्नग्रहण करतां अगर निजतां कामा नये. असा येथें सांप्रदाय आहे. पालिठाणा मुंबईहून ४८८ मैल आहे. सोनगड स्टेशनवर उतरावें लागतें. मुंबई ते सोनगड रेलवेभाडें ९ रु. ५ आणे ९ पै लागतें.

## पंबनकिनारा.

श्रीक्षेत्र रामेश्वरास पंबनची खाडी ओलांडून जावें लागतें. खाडीच्या अलीकडे मंडपम हें स्टेशन आहे. येथून पंबन किनाऱ्यास जाण्यास बोटी

सुटतात. बोटीनें जावें लागतें. मग पुढें बेटावर रेलवे आहे. पंबन किनारा स्टेशनहून रामेश्वरम् हें तिसरें स्टेशन आहे. स्टेशनहून अर्ध्या मैलावर भैरवतीर्थ व कपीतीर्थ अशीं दोन पवित्र तीर्थें आहेत. पंबन बीच हें स्टेशन मद्रासहून ४४१ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १४ आणे लागतें.

## पापनासम.

हें साउथ इंडियन रेलवेचें स्टेशन मद्रासहून २०५ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. ९ आणे लागतें. येथें ब्रह्मोत्सव म्हणून मोठा उत्सव होत असतो. येथें एक जुनें शिवाचें देवालय आहे. तेथें १०८ लिंगें आहेत. लंकेहून परततांना श्रीरामांनीं या ठिकाणीं पूजासमारंभ केला असें म्हणतात.

## पारसनाथ.

हा जैनांचा एक पवित्र पर्वत ई. आय. रेलवेच्या गिरिधी स्टेशनहून १८ मैल व कलकत्त्याहून २०० मैल आहे. याला सम्मेद शिखरजी असें म्हणतात. या पर्वतावर लहान मोठीं वीस देवालयें आहेत. चोविसां-पैकीं एकोणीस तीर्थंकरांच्या समाधी या ठिकाणीं आहेत. दर वर्षी १०। १५ हजार यात्रा भरते. गिरिधी स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. पर्वताच्या पायथ्याशीं तीन धर्मशाळा आहेत. पण वर एकही नाहीं. गिरिधी कलकत्त्याहून २०६ मैल आहे. रेलवेभाडें २ रु. ६ आणे ६ पै लागतें.

## पाटण.

बडोदें संस्थानांतील हा तालुक्याचा गांव सरस्वती नांवाच्या एका लहान नदीच्या कांठीं असून गायकवाड—मेहसाणा रेलवेचें स्टेशनही आहे. येथें बरीच जैनांची वस्ती असून त्यांचीं कमींत कमी १०० देवालयें आहेत. शहरांत जैनांच्या पुष्कळ लायब्ररी असून त्यांत ताडपत्रांवर लिहिलेल्या हस्तलेखांचा संग्रह फारच काळजीपूर्वक केला आहे. शहरा-बाहेर पूर्वीच्या शिल्प कामाचे कांहीं अवशेष नमुन्यादाखल अद्यापि आढळून येतात. हें गुजराथेंतील अती जुनें व सुप्रसिद्ध शहर आहे. तलवारी व भाले येथें तयार होतात. रेशमी व सुती कापड आणि मातीचींही भांडीं येथें होतात. येथें जैनांकरितां एक धर्मशाळा आहे. स्टेशनहून गांवांत जाण्यास टांग्यास माणशीं ४ आणे पडतात. पाटण मुंबईहून ३७८ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १ आ. ९ पै. लागतें.

## पाटणा.

बंगाल्यामध्यें हा एक जिल्हा आहे. पाटणा हें पूर्वीचें पाटलीपुत्र शहर होय. ख्रिस्ती शकापूर्वी ३०० वर्षें ग्रीक इतिहासकार मेगेस्तनीस हा चंद्रगुप्तच्या दरबारीं ग्रीसतर्फे वकील म्हणून आला होता. त्यानें पाटली-पुत्राचा उल्लेख आपल्या लेखांत केला आहे. हें शहर मूळ उदयाश्व राजानें वसविलें आहे. शहा अन्नराणी करबाला, शेरशहाची मशीद हीं प्रेक्षणीय ठिकाणें आहेत. हरमंदिर म्हणून शीख लोकांचें एक स्थान आहे. गुरु गोविंदसिंगाची जन्मभूमी असल्याविषयीं प्रसिद्ध आहे. येथून तं-बाखू, नारळ, वगैरे बाहेरगांवीं जातो. पाटणा स्टेशन कलकत्त्याहून ३३२ मैल असून रेलवेभाडें ३ रु. १० आ. ३ पै. लागतें.

## पेंद्रा.

हें ठिकाण बेंगाल, नागपूर रेलवेवर असून पेंद्रारोड हें स्टेशन कलक-त्त्याहून ५०८ मैल आहे. रेलवेभाडें ५ रु० ७ आणे ९ पै लागतें. येथून २५ मैलांवर नर्मदेचा उगम आहे. कपिलद, बारा, मोडवा आणि गुल-बकावलीचा राजवाडा, मोकादियाची देवालयें हीं येथील यात्रेचीं ठिकाणें आहेत. येथून अमरकंटकास जाण्यास चांगला रस्ता आहे. अमरकंटक येथें नर्मदेचा उगम आहे.

## पेशावर.

हें शहर पंजाबांत वायव्य सरहद्दीवर आहे. हें मूळचें महाभारतांतील गांधार प्रांताचें राजधानीचें शहर होय. शहराभोंवतीं तटबंदी असून तटास एकंदर सोळा दरवाजे आहेत. शहराला पाणी विपुल आहे. शह-रांत घोरखत्री म्हणून मोठी इमारत आहे. हे पूर्वी बुद्धभिक्षूंचे विहार होते. हल्लीं धर्मशाळेकडे तिचा उपयोग करितात. मुसलमानांच्या पुष्कळ सुंदर इमारती असून त्यांत झांदा म्हणून एक पवित्र जागा आहे. मध्य-आशिया, आफगाणिस्थान व आसपासचीं संस्थानें यांचे दरम्यान व्यापाराचें हें एक मोठें शहर आहे. गहू व हिंदी चहा हे जिन्नस येथून बाहेर जातात. शहरापासून २ मैलांवर लष्करचें ठाणें आहे. पेशावर लाहोरपासून ३८८ मैल आहे. रेलवेभाडें ३ रु. ६ आणे लागतें.

## पांडिचरी.

हें हिंदुस्थानांतील फ्रेंच वसाहतींचें मुख्य शहर दक्षिणेस कारोमांडल किनाऱ्यावर आहे. ऐतिहासिकरीत्या या शहराचें महत्व विशेष आहे. कारण राजसत्ता स्थापन होण्याचे प्रसंगीं इंग्लिश व फ्रेंच यांजमध्यें राजकारणाच्या अनेक घडामोडी या ठिकाणीं झाल्या आहेत. गव्हर्नमेंट हाऊस, माजी फ्रेंच गव्हर्नर डुप्ले याचा पुतळा, दीपगृह, बगीचे, समद्रकांठचा धक्का हीं येथलीं ठिकाणें प्रेक्षणीय आहेत. पांडिचरी हें साउथ इंडियन रेलवेचें स्टेशन मद्रासहून १२९ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. ६ आणे लागतें.

## पुनपून.

हें ई. आय्. रेलवेवर गयेच्या वाटेवर आहे. या ठिकाणीं पुनपुन नांवाची लहानशी नदी आहे. काशीहून गयेस जातांना येथें वाटेंत मुक्काम करून श्राद्धविधि केल्याखेरीज पुढें गयेस जात नाहींत. परंतु येथें धर्मशाळा वगैरे कांहीं नाहीं. लोक उघड्यावर राहतात. पुनपुन हें स्टेशन कलकत्त्याहून ३४१ मैल आहे. रेलवेभाडें ३ रु. ११ आणे ३ पै लागतें ( येथें २४ तास मुक्काम करतां येत असल्याविषयींचा विशेष नियम पहा. )

## पुणतांबें.

हें स्टेशन दौंड ते मनमाड रस्त्यावर आहे. गांव स्टेशनहून दीड मैल आहे. गांवाला गोदावरी नदी आहे. नदीकांठीं पुष्कळ जुनीं देवालयें आहेत. पुर्वी हें एक चांगलें भरभराटीचें शहर होतें असें सांगतात. पण हल्लीं वस्ती बरीच पडीक आहे. गोदावरीस जो पूल आहे त्याला विस्तीर्ण अशा २१ कमानी आहेत. पुणतांबा मुंबईहून मनमाड मार्गें २०३ मैल असून रेलवेभाडें २ रु ३ आ. लागतें.

## पुष्कर.

हें पवित्र तीर्थ व यात्रेचें ठिकाण राजपुतान्यांत अजमीरपासून सात मैलांवर आहे. अखिल भरतखंडांत ब्रह्मदेवाची पूजा फक्त याच ठिकाणीं आहे. पुष्करास ब्रह्मदेव, सावित्री, वराह, बदरीनारायण व शिवआत्मतेश्वर अशीं पांच मुख्य देवालयें आहेत. या गांवाच्या हद्दींत कोणतीही प्राणिहत्या करावयाची नाहीं. येथें सरासरी एक लाख यात्रा भरते. यात्रेंत

घोडे उंट वगैरे विकावयास येतात. वस्ती बहुतेक ब्राह्मणांची आहे. मुंबईहून अजमीरला जाण्यास रेलवेभाडें ६ रु. ४ आ. लागतें.

## फत्तेपूर सिक्री.

ही मोगल साम्राज्याची पहिली राजधानी संयुक्त प्रांतांत आग्रा जिल्हांत आग्र्याहून तेवीस मेल आहे. येथील मुख्य इमारत म्हणजे एक अतिशय भव्य मशीद आहे. येथें शेख सलिमखिस्ती या मुसलमान साधूची एक कबर आहे. या साधूच्या कृपाप्रसादानेंच अकबरास सेलिम हा मुलगा झाला. ही कबर पांढऱ्या संगमरवरी दगडाची असून फारच नकशीदार आहे. याखेरीज दुसऱ्याही पुष्कळ सुंदर इमारती आहेत. त्यांत दिवाण-इखास, दिवाण इआम, हत्तीदरवाजा, हिरनमिनार इत्यादि प्रमुख आहेत. अचनेरा हें बी. बी. सी. आय चें जवळचें स्टेशन आहे. परंतु आग्र्याहूनही जाणें सोयीचें आहे. आग्रा कलकत्याहून ७९२ मैल आहे रेलवेभाडें ७ रु. ३ आणे ९ पै लागतें.

## बंगलोर.

हें शहर म्हैसूर संस्थानांत असून अम्मल इंग्रज सरकारचा आहे. येथील हवापाणी फार चांगलें आहे. येथील पाहण्यासारखीं ठिकाणें म्हणजे किल्ला, लालबाग व कबनपार्क हीं होत. हा किल्ला इ. स. १५३७ त बांधला आहे. लालबाग ही सार्वजनिक बाग असून फारच रम्य आहे. कबनपार्क हें संध्याकाळचे हवा खाण्याचें ठिकाण आहे, बंगलोरास लष्क-रचें ठाणे आहे. लष्करी बँड कबनपार्कमध्यें बऱ्याच वेळां ऐकूं येतो. बंगलोरास एकंदर नऊ धर्मशाळा आहेत, त्यांत तोटण्णाचेट्टी या लिंगा-यत धनिकानें बांधलेली स्टेशनाजवळ आहे. मद्रासहून बंगलोर २१९ मैल आहे. रेलवे भाडें २ रु. ५ आणे. हें शहर व्यापाराविषयीं प्रसिद्ध आहे.

## बडोदा.

ही गायकवाडांची राजधानी आहे. सध्याचे महाराज श्री सयाजीराव यांनीं शहरची व संस्थानच्या एकंदर राज्यकारभाराची फारच महत्वाची सुधारणा केली आहे. नजरबाग व मकरपुरा हे राजवाडे, न्यायसभा वगैरे सार्वजनिक इमारतींनीं शहरास मनोहर शोभा आलेली आहे. राज-महाल हा नवीन राजवाडा बांधण्यास एकंदर ४५,००००० रु. खर्च

आला असें म्हणतात. शहरांत अनेक देवालयें असून त्यांत विठ्ठल, मांडवी, खंडेराव व स्वामी नारायण हीं अत्यंत प्रेक्षणीय आहेत. संस्थानाच्या खजिन्यांत जडजवाहीर फारच किमतीचें आहे. बडोदा मुंबईहून २४८ मैल आहे. रेलवेभाडें २ रु. १३ आणे लागतें.

## बाबाबुदन अथवा चंद्रद्रोण.

म्हैसूर संस्थानांत कडूर जिल्ह्यांत ही पर्वताची रांग आहे. हिचा आकार घोड्याच्या टापांसारखा आहे. हिंदुस्थानांत कॉफीची लागवड याच ठिकाणीं पहिल्यांदा करण्यांत आली. ही कॉफी मूळ बाबाबुदन नामक एका मुसलमान साधूनें सुमारें दोन शतकांपूर्वी मक्केहून या ठिकाणीं आणली; म्हणून या पर्वतास त्याचें नांव पडलें आहे. त्याची समाधी टेंकडीवर एका गुहेंत आहे. ही गुहा सध्या एका मुसलमान कलंदारचे ताब्यांत आहे. तो येथून एका मैलावर अटिगुंटी या गांवीं राहतो. हा पर्वत दत्ताचें स्थान आहे असेंही मानतात. बाबाबुदन हें ठिकाण मद्रास स. म. रेलवेच्या स्टेशनापासून ४० मैल आहे. बैडगाड्या मिळतात. कडूर स्टेशन पुण्याहून ४९८ मैल आहे. रेलवेभाडें ५ रु. ३ आणे ३ पै लागतें.

## बदामी.

विजापूर जिल्ह्यांतील हा तालुक्याचा गांव स्टेशनाहून तीन मैल आहे. जैनांचें पोखरून तयार केलेलें विवर व देवालय हीं पाहण्यासारखीं आहेत. तें इ. स. ६५० च्या सुमाराचें आहे असें समजतें. ब्राह्मणी तऱ्हेच्या रचनेचींही तीन विवरें येथें आहेत. त्यांपैकीं एकावर जो शिलालेख आहे त्यांत इ. स. ५७९ असा उल्लेख आहे. यापैकीं एके ठिकाणीं नरसिंह अवतार, शेषशायी विष्णु इत्यादि खोदकाम प्रेक्षणीय आहे. स्टेशनाहून ९ मैलांवर परसगड हा गांव आहे. या ठिकाणीं बनशंकरी देवीचें फार मोठें देऊळ आहे. कर्नाटकांत ही देवी पुष्कळांच्या घरीं आहे. जानेवारींत मोठी यात्रा भरते, स्टेशनवर धर्मशाळा आहे, परंतु परसगडला ही सोय नाहीं, परसगडला जाण्यास बैलगाड्या मिळतात. बदामी हें स्टेशन मुंबईहून होटगीमार्गें ४२३ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ६ आणे ९ पै लागतें.

---

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

### बद्रीनाथ.

संयुक्त प्रांतांतील गर्वाल जिल्ह्यांत हिमालय पर्वताचें हें एक शिखर आहे. शिखराची उंची समुद्रसपाटीपासून २३२१० फूट आहे. या ठिकाणास जवळचें रेलवे स्टेशन म्हणजे हरिद्वार. हें औध आणि रोहिलखंड रेलवेचें स्टेशन आहे. हरिद्वारहून पुढें पायीं अगर खेंचरावर जावें लागतें. हें देवालय सुमारें आठशें वर्षांपूर्वी शंकरस्वामी म्हणून एका स्वामींनीं बांधलेलें आहे. ही मूर्ती स्वामींनीं नदीच्या तळाशीं दहा वेळां बुडी मारून काढून आणली आहे असें म्हणतात. साऱ्या भारतवर्षांत हें स्थान अति पवित्र आहे. येथील पवित्र तीर्थावर स्नान करण्यास दरवर्षी लाखों लोक येतात. येथील मुख्य उपाध्यायास रावळ असें म्हणतात. हा दक्षिणेंतील किरात मलबाराकडील ब्राह्मण आहे. यात्रेकरूंकरतां पुष्कळ धर्मशाळा आहेत. हरिद्वार हें औध आणि रोहिलखंड रेलवेनें सहारणपूरपासून ४९ मैल आहे. रेलवेभाडें ११ आणे ३ पै. लागतें.

### बाघेरहट.

बंगाल्यांत खुलना जिल्ह्यांतील हा तालुक्याचा गांव आहे. गांवाच्या पश्चिमेस खान जहानच्या सुप्रसिद्ध इमारतींचे अवशेष अद्यापि आहेत. तीन मैलांवर शास्त गुमझ म्हणून सुप्रसिद्ध मशीद आहे. या मशिदीला ६० कळस आहेत. बाघेहरटपासून दीड मैलांवर खान जहानची कबर आहे. बाघेहरट खुलनाहून जलमार्गानें २२ मैल आहे. बोटीला माणशीं दोन तीन रुपये पडतात. धर्मशाळा वगैरे कांहीं नाहीं. खुलना ईस्टर्न बेंगाल स्टेट रेलवेचें स्टेशन कलकत्त्याहून १०९ मैल आहे. रेलवे भाडें १ रु. ६ आणे ९ पै लागतें. येथील मुख्य व्यापार म्हणजे तांदूळ आणि सुपारी हा होय.

### बक्सार.

अयोध्या प्रांतांत उनाव जिल्ह्यांत उनावपासून ३४ मैलांवर गंगेचे कांठीं हा गांव आहे. या ठिकाणीं चंडिकेचें सुप्रसिद्ध देऊळ आहे. या ठिकाणीं भागीरथीचें स्नान करण्यास हजारों लोक येतात. हा गांव आणि

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

दुसरी बरीच इस्टेट माजी महाराज श्री दिग्विजय सिंह के. सी. एस्. आय्. यांस त्यांच्या राजनिष्ठेबद्दल व ५७ सालच्या बंडांत झालेल्या कानपूर येथील कत्तलींतून पळून आलेल्या इंग्रज लोकांस आश्रय दिल्याबद्दल इनाम आहे. उनाव हें स्टेशन लखनोहून ३४ मैल आहे. रेलवेभाडें ७ आणे लागतें.

## बलदेव.

हें यात्रेचें ठिकाण संयुक्त प्रांतांत मथुरेहून १० मैल आहे. येथें बलदेवाचें देऊळ आहे. हेंच नांव गांवास पडलें आहे. देवालयाजवळ तीर्थ आहे. त्याला क्षिरसागर असें म्हणतात. वर्षांतून दोन जत्रा भरतात. दोन्ही खेपेस दहा वीस हजार लोक जमतात. येथें बारा कुंज असून २ धर्मशाळा आहेत. मथुरा स्टेशन ( जी. आय्. पी. रेलवे ) वर एक्के व गाड्या मिळतात. मथुरा मुंबईहून ८६८ मैल आहे. रेलवेभाडें. ९ रु. २ आणे लागतें.

## बलिघाटम्.

मद्रास इलाख्यांतील विझागापट्टम जिल्ह्यांत हा गांव आहे. या गांवाजवळ ब्रह्मेश्वरदु म्हणून महादेवाचें देवालय आहे. देवाचें मुख नेहमीच्या पद्धतीप्रमाणें पूर्वेस नसून पश्चिमेस आहे. पंडेरु अथवा वराहनद, या नांवाची नदी असून ती या ठिकाणीं उत्तर वाहिनी आहे. नदीतीरावर भस्मासारखी पांढरी माती असलेली एक लहानशी जागा आहे. ही चक्रवर्ती बलीनें यज्ञ केलेली जागा असें सांगतात. या ठिकाणास रेलवे स्टेशन नरसापट्टम् हें २३ मैल आहे. नरसापट्टम् हें रायापुरमहून ४३९ मैल आहे. रेलवेभाडें ५ रु. १२ आणे लागतें. या ठिकाणीं छत्रम् म्हणजे धर्मशाळा नाहीं.

## बाणावर.

हें मद्रास आणि सदर्नमराठा रेलवेचें स्टेशन पुण्याहून ५१३ मैल आहे. रेलवेभाडें ५ रु. ५ आणे ६ पै आहे. येथून हलेबिद आणि बेलूर या दोन ठिकाणांस जातां येतें. हलेबिद म्हणजे मूळचें दोरासमुद्र ही प्रबळ होयसळवंशीय राजांची राजधानी होती. येथें हिंदुस्थानांतील कांहीं

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमे कांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६।

पुराणप्रसिद्ध देवालयांचे अवशेष अद्यापि आहेत. यांपैकीं मुख्य म्हणजे अकराव्या शतकांत बांधावयास सुरवात केलेलें होयसळेश्वराचें देवालय हें होय. परंतु तें पुरें झालेलें नाहीं. येथील शिल्पकामासंबंधानें मुंबइचे गव्हर्नर फर्ग्युसनसाहेब यांनीं आपल्या ग्रंथांत " Had it been completed, it is one of the buildings on which the advocate of Hindu architecture would desire to take his stand. " असें लिहून ठेविलें आहे. येथील जैनांचीं देवालयें देखील पाहण्यासारखीं आहेत. बेलूर येथील चन्नकेशवाचें देवालय असेंच सुंदर आहे. हें होयसळवंशीय राजा विष्णुवर्धन यानें १२ व्या शतकांत बांधलें आहे. ह्या देवालयाचें खोदकाम अप्रतिम आहे. फर्ग्युसनसाहेब म्हणतात " The amount of labour which each face of the porch displays in such as I believe never was bestowed on any surface of equal extent in any building in the world ". बेलूर बाणावर स्टेशनपासून २८ मैल आहे. रस्ता चांगला आहे.

### बांडुकपूर.

हें स्टेशन जी. आय. पी. च्या कटनी-बीना शाखेवर आहे. वसंतपंचमीस व शिवरात्रीस अशा दोन यात्रा भरतात. येथील जोगेश्वरमहादेवास भागीरथीचें व नर्मदेचें तीर्थ आणून घालण्यास पुष्कळ लोक येतात. हें देऊळ दामोहाचा नजाजी बल्लाळ याच्या बापानें १७८१ मध्यें बांधलें आहे. मूर्ती अमुक ठिकाणीं आहे ती घेऊन येऊन येथें स्थापना कर असा त्यास स्वप्नांत दृष्टांत झाला होता. हें स्टेशन कलत्याहून बेंगाल-नागपूर रेलवेनें ७०४ मैल आहे. रेलवेभाडें ६ रु. ४ आणे पडतें.

### बांसडा.

हें गुजराथेंत एक संस्थान आहे. येथून ७ मैलांवर उनाय या गांवीं एक उष्ण पाण्याचा झरा आहे. येथेंही पुष्कळ लोक जातात.

### बाराबर ( टेंकडी. )

बंगाल्यांत गया जिल्ह्यांत ही पर्वतांची रांग आहे. भूगर्भशास्त्रवेत्त्या लोकांस ही जागा एक करमणुकीचें साधन आहे. कारण येथें पुराण-

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

प्रसिद्ध असे अवशेष बरेच आहेत. येथून पटणा-गया रेलवेचें बेला हें स्टेशन ८ मैल आहे. या टेंकडीच्या उंच शिखरावर सिद्धेश्वराचें एक लिंग आहे. अनंतचतुर्दशीस मोठी यात्रा भरते. दक्षिणेस टेंकडीचे पायथ्याशीं "सात-घर" म्हणून लेण्ीं आहेत. यांपैकीं तीन लेण्यीं जवळच्या नागार्जूनी टेंकडीवर आहेत. येथून जवळच पटलगंगा म्हणून तीर्थ आहे. आणि कण्वडोलच्या पायथ्याशीं गौतमबुद्धाची प्रचंड मूर्ती आहे. याशिवाय दुसऱ्या पुष्कळ मूर्ति वगैरे ह्या रांगेंत आहेत.

## बटेसर.

हा गांव आग्र्याच्या आग्नेय दिशेस ४१ मैलांवर यमुनेच्या कांठीं आहे. या स्थानाचा प्राचीन इतिहास दुर्बोध आहे. वटेश्वरनाथ या लिंगावरून हें नांव पडलें आहे असें मानतात. पण दंतकथा अशी आहे कीं, या ठिकाणीं पूर्वीं सूर्यपूर या नांवाचें शहर होतेंच व जैनलोक अझून देखील याच नांवानें यास संबोधितात. हें देवालय इ० स १६४६ त राजाबदनसिंह यांनें बांधलें आहे. कार्तिकांत यात्रा भरते. त्या वेळीं. गुरांचा फार मोठा बाजार भरतो. हत्ती, उंट, घोडे, म्हशी, इत्यादि सर्व जनावरें विक्रीस येतात. या ठिकाणास इ. आय्. रेलवेचें शिकोहाबाद हें स्टेशन बारा मैल आहे. आग्र्याहून शिकोहाबादेस रेलवेभाडें आठ आणे पडतें.

## बौसी.

बंगाल्यांत भागलपूर जिल्ह्यांत मंदारपर्वताच्या पायथ्याशीं हा गांव आहे. पर्वताभोवतीं अनेक इमारतींचे अवशेष तलाव, मोठमोठ्या विहीरी व पाषाणाच्या मूर्ती आढळतात. यावरून प्राचीन काळीं या ठिकाणीं एखादें मोठें शहर असावें. स्थानिक दंतकथा अशी ऐकिवांत आहे कीं, प्राचीन काळीं दीपावलीचे रात्रीं या इमारतींत लाखो दीप लावले जात असत. हल्लीं त्या इमारतींचे जे अवशेष आहेत व त्यांच्या भिंतीला जीं दिवे ठेवण्याचीं लहान लहान लाखों भोंकें आहेत त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते. ह्यांतीलच एका कमानीवर जो संस्कृत शिलालेख आहे त्यावरून पाहतां सुमारें ३०० वर्षांपूर्वीं हें नगर अस्तित्वांत असावें असें दिसतें.

---

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमे-कांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

मांदारपर्वतावरील मधुसूदनाच्या देवालयाची वाताहात झाल्यावर तेथील मूर्ती येथें आणून स्थापिली असें सांगतात. बौसी हें ईस्टर्न बेंगाल स्टेट रेलवेचें स्टेशन कलकत्त्याहून ३६३ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १४ आणे लागतें.

## बिथुर ( ब्रह्मावर्त. )

संयुक्त प्रांतांत कानपूरपासून १२ मैलांवर भागीरथीचे कांठीं हा गांव आहे. ब्रह्मावर्तास यात्रेस हजारों लोक येतात. नदीला घाट असून वरील देवालयांमुळें शहराला एक अपूर्व शोभा आली आहे. ब्रह्मघाट म्हणून जो येथील मुख्य घाट आहे तो अयोध्येचा नबाब घियासुद्दीन तघलख याचा दिवाण राजा टिकाटीराय यानें बांधलेला आहे. शेवटचा पेशवा बाजीराव यास याच ठिकाणीं ठेवलें होतें. बिथुर स्टेशन कानपूरहून १६ मैल व मुंबईहून ८६० मैल आहे. रेलवेभाडें अनुक्रमें २ आणे ९ पै व ९ रु. १५ आणे लागतें.

## बऱ्हाणपूर.

हें तटबंदीचें शहर मध्यप्रांतांत आहे व हें जी. आय. पी. चें स्टेशन आहे. शहर स्टेशनापासून तीन मैल आहे. हें शहर इ. स. ४०० मध्यें खानदेशांतील तारक घराण्यांतील पहिला स्वतंत्र सरदार नासिर-खान यानें वसविलेलें आहे. शहरांत नळ आणून पाण्याचा विपुल पुरवठा केलेला आहे. येथें दोन उत्कृष्ट मशीदी आहेत. पादशहा किल्ल्याचे अद्यापि जे अवशेष आहेत त्यांत राजघराण्यांतील स्त्रीवर्गा ( झनाना ) ची स्नान करण्याची जागा म्हणजे तुर्क लोकांच्या स्नानपद्धतीचा एक नमुना पाहण्यासारखा आहे. लालबाग म्हणून पूर्वीच्या नबाबांचा राज-विलासी बाग स्टेशनपासून अगदीं जवळ आहे. जानेवारी ते एप्रिल व आगस्ट ते आक्टोबर या दरम्यान या ठिकाणीं अनेक उरूस होतात. त्यांत हरगतशहा बिकारीचा उरूस सर्वांत दांडगा होतो. दहा हजारा-पर्यंत लोक जमतात. येथें किनखापाचें व रेशमी काम चांगलें तयार होतें.

---

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमे-कांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

स्टेशनवर धर्मशाळा आहे. ब्ऱ्हाणपूर मुंबईहून ३१० मैल आहे. तिसरा वर्ग रेलवे भाडें ६ रु. १२ आणे लागतें.

## भद्राचलम्.

मद्रास इलाख्यांत गोदावरी जिल्ह्यांतील हा तालुक्याचा गांव राजमहेंद्रीहून १०४ मैल आहे. हें एक रामाचें स्थान आहे. लंकेस जातांना श्री रामचंद्रांनीं गोदावरी येथेंच ओलांडली म्हणतात. रामनवमीस मोठी यात्रा भरते. हें देवालय मूळ सुमारें चार शतकांपूर्वी प्रतिष्ठा नामक ऋषीनें बांधलें आहे. पण वेळोवेळीं त्यांत नवीन भर घातली आहे. ह्या देवालयास निजामसरकाराकडून वर्षासन आहे. येथें फक्त वैष्णवांकरितां एक व इतर सर्वांकरितां एक अशा दोन धर्मशाळा आहेत. भद्राचलम् हें निजामरेलवेच्या येलांडू स्टेशनहून ५६ मैल आहे. येलांडूस बैलगाड्या मिळतात. येलांडू बिझवाड्याहून ९२ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. लागतें.

## भागलपूर.

हें ईस्ट इंडियन रेलवेचें स्टेशन असून गंगेच्या कांठीं व्यापाराचें एक चांगलें शहर आहे. कलकत्त्याहून रेलवेभाडें ३ रु. ३ पै. लागतें. येथें सतरंज्या चांगल्या होतात. स्टेशनहून तीन मैलांवर जैनांचें एक देवालय आहे. बौद्धांच्या राजधानीचें शहर चंपानगर हें येथून ४ मैलांवर आहे. १९ मैलांवर सुलतानगंज येथें गोपीनाथाचें देवालय गंगेच्या प्रवाहाच्या मध्यभागीं एका खडकावर बांधलें आहे. पहावयास जाणारास नावेंत बसून जावें लागतें.

## भांडक.

मध्यप्रांतांत चांदा जिल्ह्यांत चांदापासून १८ मैलांवर हां गांव आहे. महाभारतांत वर्णिलेलें भद्रावती शहर या ठिकाणीं होतें अशी दंतकथा सांगतात. भीमानें अश्वमेध यज्ञाचे वेळीं शामकर्ण येथील राजाकडून ह्याच ठिकाणाहून हिरावून नेला. अद्यापि येथील " देवल " टेंकडीवर भीमाचीं पावलें असलेलीं दाखवितात. भांडक व आसपासच्या डोंगरांत असलेलीं लेणीं, टेंकड्यांवरील किल्ल्याचे अवशेष भद्रावतीचें देऊळ व

---

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

शिवाय अनेक जीर्ण देवालयें, तळीं वगैरे प्राचीनकाळीं हें ठिकाण मोठें शहर असल्याचें दाखवितात.

## भांडुप.

मुंबईस पाण्याचा पुरवठा जेथून होतो तें विहार आणि तुलसी हीं सरोवरें येथून ४ मैलांवर आहेत. हीं पहावयास जाणारांनीं गाडीची वगैरे अगोदर तजवीज केली पाहिजे. Kennery eaves म्हणून जीं प्रसिद्ध लेणीं आहेत तीं येथूनच जवळ आहेत. परंतु ठाण्याहून रस्ता चांगला आहे. भांडुप हें स्टेशन मुंबईहून १७ मैल आहे. रेलवेभाडें ४ आणे लागतें.

## भरतपूर.

राजपुतान्यांतील भरतपूर संस्थानचें हें राजधानीचें शहर आहे. भरतपूर हें नांव भरतापासून मिळालें आहे. येथें श्रीकृष्णास बिहारी या नांवानें भजतात. येथील नामांकित किल्ला अनेक लढायांत कामास आल्यामुळें इतिहासांत प्रसिद्धच आहे. येथें चवऱ्या चांगल्या तयार होतात. भरतपूर राजपुताना माळवा रेलवेचें स्टेशन मुंबईहून ८१९ मैल आहे. मुंबईहून आग्रामार्गें तिसऱ्या वर्गाचें रेलवेभाडें ८॥ रु. लागतें.

## भवानंदपूर.

बंगाल्यांत दिनाजपूर जिल्ह्यांतील सालबराई परगण्यांत हा गांव आहे. येथें आंबराईंत एका मुसलमान साधूचें कबरस्थान आहे. ह्या पिराचा नेकमाड म्हणून मोठा उरूस भरतो. आसपासचे हजारों लोक येतात; बंगाली वर्षाचा पहिला दिवस ह्मणजे ता. १० अगर ११ एप्रिल हा या उरुसाचा प्रथम दिवस होय. या वेळीं पुर्णिया प्रांतांतील बैल, भूतानी तट्टें, काबूलकडील घोडे आणि दार्जलिंग व आसाम प्रांतांतील हत्ती वगैरे जनावरांची फार मोठी विक्री होते. दिनाजपूर कलकत्त्याहून १०४ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. ५ आ. ९ पै. लागतें.

## भेराघाट.

हा गांव जबलपुराजवळ नर्मदेचे कांठीं आहे. नदीतीरावरील रमणीय देखावा प्रेक्षणीय आहे. या ठिकाणीं नदींत अगदीं शुभ्र खडक आहे.

---

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

नदीचा प्रवाह दोन उंच खडकांच्या एका सुळक्यामधून जातो. या ठिकाणीं पात्र इतकें अरुंद आहे कीं, लोक त्या खिंडीला " माकडाची उडी " असें म्हणतात. हा खडका इतका शुभ्र आहे कीं, त्याला इंग्रजींत Marble rocks असें म्हणतात. चंद्रप्रकाशांत तर येथील देखावा अवर्णनीय आहे. जवळच एका निमुळत्या टेंकडीवर महादेवाचें देवालय आहे. भेराघाट व Marble rocks हीं ठिकाणें जी. आय्. पी. रेलवेच्या मिरगंज स्टेशनहून तीन मैलांवर आहेत. मिरगंज मुंबईहून ६०७ मैल आहे. रेलवेभाडें ( तिसरा वर्ग ) ६ रु. ९ आ. पडतें.

## भिलसा.

हें ठिकाण बौद्ध स्तूपसमुदायामुळें प्रसिद्ध आहे. पूर्वपश्चिम १७ मैल व दक्षिणउत्तर ६ मैल एवढ्या टापूत बौद्धांचे अनेक स्तूप आहेत. सांची येथें १०, येथून ८ मैलांवर सोनारीस ८, सादात्रा येथें ९ व येथून ३९ मैलांवर असलेल्या भोजपूर येथें एकंदर ३९ बौद्ध स्तूप आहेत. हे बहुतेक अशोकाचे वेळचे म्हणजे तिसऱ्या शतकांतील असावेत. भिलसा हें जी. आय. पी चें स्टेशन भोपाळ आणि बिना यांचे मध्यें आहे. मुंबईहून ५५९ मैल आहे. रेलवेभाडें ६ रु. १ आणा लागतें.

## भोपाळ.

मूळचें भोजपाळ. सुप्रसिद्ध भोजराजानें वसविलेलें हें शहर आहे. बिटवा नदीस येऊन मिळणारा एक फांटा अडवून जो तलाव बांधला आहे तो शहराजवळच आहे. भोपाळ हें संस्थान असून राजधानीचें शहर आहे. संस्थानचें क्षेत्रफळ ९००० चौरस मैल आहे. सुलतान शहाजहाना बेगम या येथील मालक आहेत. शहरची रचना जुनाट असल्यामुळें अव्यवस्थित आहे. जम्मा मशीद म्हणून शहरच्या मध्यभागीं एक भव्य इमारत आहे. ही पुष्कळ उंच असल्यामुळें आगगाडींतून जातांना देखील लांबवर दिसते. जवळच्या एका टेंकडीवर फत्तेगड म्हणून किल्ला आहे तेथून शहरचा व पायथ्याशीं असलेल्या विस्तीर्ण तलावाचा

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

देखावा फारच मजेचा दिसतो. शहर स्टेशनाहून मैलभर आहे. भोपाळ मुंबईहून ५२१ मैल आहे रेलवेभाडें ५ रु १० आणे लागतें.

## भुवनेश्वर.

हें यात्रेचें ठिकाण बेंगाल नागपूर रेलवेवर आहे. इ. स. ५०० पासून ११३० पर्यंत म्हणजे सुमारें सहा शतकें ओरिसाच्या केसर घराण्यांतील राजांची ही राजधानी होती. येथें बिंदुसरोवर म्हणून जें पवित्र तीर्थ आहे त्याभोवतीं पूर्वीं ७००० देवालयें होतीं. हल्लीं सुमारें ५०० शिल्लक आहेत. बाकीचीं कालाच्या तडाख्यांत सापडून नामशेष झालीं आहेत. या देवालयांवरून ओरीसांतील प्राचीन शिल्पकामाची चांगलीच ओळख पटते. मुक्तेश्वराचें देवालय ह्मणजे भुवनेश्वरचे एक रत्नच आहे. येथून तीन मैलांवर असलेल्या खोंडगिरी आणि उदयागिरी या टेकड्यांवर तिसऱ्या व चौथ्या शतकांतील बौद्ध लोकांचीं लेणीं व देवळें यांचे अवशेष आहेत. पुरीहून परत जातांना लोक या ठिकाणीं उतरतात. भुवनेश्वर कलकत्त्याहून २७१ मैल आहे. रेलवेभाडें ३ रु. ९ आणे लागतें.

## भडोच.

हें बी. बी. सी-आय् रेलवेचें स्टेशन असून गुजराथ प्रांतातील कपाशीच्या व्यापारामुळें व्यापाराचें एक महत्वाचें ठिकाण आहे. येथून १० मैलांवर सकलतीर्थ म्हणून एक पवित्र स्थान नर्मदेचे कांठीं आहे. सकलतीर्थाजवळ एका बेटावर एक विस्तीर्ण वटवृक्ष आहे. त्याला ‘ कबीरवड ’ असें म्हणतात. हा वृक्ष इतका प्रचंड आहे कीं, त्याच्या छायेखालीं १०००० माणसें बसूं शकतील. या झाडाविषयींची आख्यायिका अशी आहे कीं तें कबीराच्या दांत कोरण्यापासून उगवलें आहे. म्हणून त्याला कबीरवड असें म्हणतात. भडोच कुलाबा ( मुंबई ) स्टेशनहून २०४ मैल आहे. रेलवेभाडें २. रु ६ आणे लागतें. स्टेशनवर गाड्या मिळतात.

## मुंबई.

हें पश्चिम हिंदुस्थानांतील एक मुख्य बंदर व इलाख्याचें मुख्य ठिकाण असून मुंबईसरकारचें राजधानीचें शहर आहे. मुंबई हें बंदर तसेंच बेट-

---

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

ही आहे. हें बेट प्रथम पोर्तुगीज लोकांकडे होतें. पुढें त्यांनीं इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस यास आंदण म्हणून दिलें. सन १७७४ व १७८२ यांचे दरम्यान इंग्रज व मराठे यांचा जो पहिला सामना झाला त्यानंतर मुंबई बेटाची पूर्ण मालकी इंग्रजांकडे आली. तेव्हांपासून सारखी भरभराट होत जाऊन मुंबई हें इलाख्याचें मुख्य ठिकाण बनलें. मुंबई बंदराचा देखावा बहारीचा आहे. समुद्राची भरतीओहटी व लाटा आणि त्या येत असतांना हेलकावे खाणाऱ्या बोटी यांजकडे पाहून सृष्टिदेवतेच्या विशाल व मनोहर स्वरूपाविषयीं साश्चर्य कुतूहल वाटल्याखेरीज रहात नाहीं. मुंबई शहराच्या पांच पांच, सात सात मजली इमारती व शहराची एकंदर रचना यांची वास्तविक प्रत्यक्ष पाहिल्या खेरीज खरी कल्पना होणें केवळ दुरापास्त आहे. मुंबईस जीं पहाण्यासारखीं ठिकाणें आहेत त्यांत एलेफंटा व केनेरी हीं लेणीं सुप्रसिद्ध आहेत. एलेफंटास जाण्यास माझगांव बंदराहून समुद्रमार्गानें जवळ जवळ एक तास लागतो. विहार व तुळसी या नांवांचे दोन विस्तीर्ण तलाव पहाण्यासारखे आहेत. मुंबईसारख्या अफाट वस्तीच्या शहरांतील सर्वच प्रेक्षणीय ठिकाणांची वाचकांस सविस्तर ओळख करून देणें कठीण आहे; म्हणून बहुतेक प्रमुख ठिकाणांचा थोडक्यांत उल्लेख केला आहे. तीं ठिकाणें येणेंप्रमाणें:—

१ बोरीबंदर स्टेशन.
२ क्राफर्ड मार्केट ( बोरीबंदर स्टेशन जवळ )
३ राणीचा बाग. Victoria Gardens ( भायखळ्याजवळ )
४ म्युनसिपालिटी ( बोरीबंदर समोर )
५ पांजरपोळ ( भुलेश्वर )
६ ग्रँट मेडिकल कॉलेज ( भायखळा स्टेशन )
७ विश्वविद्यालय.
८ राजाबाईटॉवर ( एस्प्लेनेड रोड )
९ हायकोर्ट.
१० सरकारी टांकसाळ ( टाऊन हालाजवळ )

( गो ) गोपाळ त्रिंबक दांडेकर सुरत यांचा टांचेपर्यंत येणारा गोमेकांठी पितांबर मजबूत असून रु. फक्त ९८१४ व कद रु. ६॥.

११ मलबार हिल.
१२ प्लेग लॅबोरेटरी ( परळ )

याखेरीज समुद्राला बांधलेले मोठे मोठे धक्के, गिरण्या, रेलवे, वगैरेंचे शेंकडों कारखाने व इतर अनेक चिजा पहाण्यासारख्या आहेत. राणीच्या बागेंतील पदार्थसंग्रहालय पाहून सृष्टींतील अनेकविध जिनसांच्या व जीव-कोटीच्या मूर्त प्रतिमा पाहून मनुष्य अगदीं चकित होऊन जातो एवढेंच नाहीं पण हा प्रचंड संग्रह पाहून मनुष्याचे मनांत अनेक विचारतरंग उद्भवतात. व त्यापासून पुष्कळ बोधही मिळतो. याचा प्रत्यक्ष अनुभव प्रत्येकानें जरूर घ्यावा.

## मदुरा.

मद्रास इलाख्यांतील हें जिल्ह्याचें शहर अतिप्राचीन व सुप्रसिद्ध आहे. सुंदरेश्वर आणि मीनाक्षीचें एक प्रचंड देवालय आहे. देवालयास नऊ गोपुर आहेत. त्यांपैकीं एकाची उंची १५२ फूट आहे. येथील सभा-मंडपास एक हजारावर दगडी खांब आहेत. हा सभामंडप आर्य नायकानें इ. स. १५५० च्या सुमारास बांधला आहे. ह्या देवालयाचें विस्तीर्णत्व व खोदकाम पाहिल्यावर मनुष्य चकित होऊन जातो. हें प्रत्येकानें एकवार जरूर जाऊन पहावें. मीनाक्षीचें दर्शन झाल्यावर तहानभूक नाहींशी होते. देवालयाचें नकशीकाम सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. तिरुमलची धर्मशाळा देखील फारच नामी बांधलेली आहे. ही जागा तिरुमल राजानें महादेवाची भेट घेण्याकरितां बांधली असें म्हणतात. शहरापासून दीड मैलावर तेप्पाकुलम् नांवाचा मोठा तलाव आहे. तळ्याच्या मध्यभागीं बेट असून त्यावर चारी बाजूंस चार व मध्यें एक अशीं पांच देवळें आहेत. जानेवारींत होणाऱ्या उत्सवांत तळ्याभोंवतीं जिकडे तिकडे दिव्यांचा लखलखाट होतो. हा देखावा पहाण्यासारखा असतो. मदुरा रामेश्वराचे वाटेनेंच आहे. मद्रासहून ३४७ मैल असून रेलवेभाडें ३ रु. १३ आणे लागतें.

## मद्रास.

पूर्वेस कलकत्ता, पश्चिमेस जशी मुंबई: तसेंच दक्षिणेस मद्रास हें इला-ख्याचें मुख्य शहर असून अठराव्या शतकांतील ईस्ट इंडिया कंपनी व फ्रेंच यांच्या उलाढालींमुळें इतिहासप्रसिद्ध आहे. येथील सर्वसाधारण

भाषा म्हटल्या म्हणजे तेलगू व तामिल ह्या होत. पदार्थसंग्रहालय, स्कूल ऑफ आर्ट, व्हिक्टोरिया हॉल, लॉर्ड मनरो व कॉर्नवालिस यांचे पुतळे, फोर्ट सेन्ट जॉर्ज हा किल्ला हीं ठिकाणें बघण्यासारखीं आहेत. या किल्ल्यांत तोफखाना असून त्यांत टिपुसुलतान जवळून काबीज केलेल्या तोफा ठेवलेल्या आहेत. कर्नाटकच्या नबाबाचा जुना राजवाडा, वेधशाळा, गव्हर्मेंट हाऊस हीं दुसरीं ठिकाणें आहेत. मद्रासच्या गवती चटया तर नामांकित आहेत. प्रवाशास रात्रीची विश्रांती सुखानें घेतां येण्यास या चटयांच्या अंगचा मृदुपणा फार चांगला उपयोगी पडतो. याचा अनुभव या स्थलवर्णनाच्या वाचकांनीं एकवार अवश्य पहांवा अशी प्रस्तुत लेखकाची आग्रहाची विनंती आहे. शहरांत उतरण्याच्या सोयी म्हणजे धर्मशाळा पुष्कळ आहेत. त्यांत नामदार रामस्वामी मुदलियार यांनीं बांधलेली धर्मशाळा सेंट्रल स्टेशन ( मद्रास ) च्या जवळ आहे. मद्रास शहर मुंबईहून ७९४ मेल आहे. मुंबईहून मद्रासला मेलनें रेलवेभाडें ११ रु. ८ आणे लागतें.

## महाबलपुर.

हा गांव मद्रास इलाख्यांतील चिंगलपट जिल्ह्यांत आहे. भूगर्भशास्त्रवेत्यांस हें दक्षिण हिंदुस्थानांतील एक महत्वाचें ठिकाण आहे. पांचरथ ऋषीचीं लेणीं व विष्णु आणि महादेवाचीं देवालयें हीं ठिकाणें फारच जुनीं आहेत. ह्या लेण्यांतील कित्येक भाग वेरूळप्रमाणें नामांकित आहेत. त्यांतल्या त्यांत विशेषतः कृष्णमंटपम् हा भाग अप्रतिम आहे. या संबधानें मि. कोल या इंग्रज गृहस्थानें This is one of the most sprited lifelike pieces of sculpture to be seen any where असे उद्गार काढले आहेत. चिंगलपट हें स्टेशन मद्रासहून ३७ मैल आहे. रेलवेभाडें ७ आणे ३ पै पडतें. स्टेशनवर महाबलपुरास जाण्यास झटके मिळतात.

## माहेजी.

हें स्टेशन भुसावळचे जवळ आहे. माहेजी या नांवाचें देवीचें स्थान स्टेशनहून २ मैलांवर आहे. दरवर्षीं फार मोठी यात्रा भरते. माहेजी

स्टेशन मुंबईहून २४१ मैल आहे. रेलवेभाडें मुंबईहून २ रु. ८ आणे लागतें. यात्रेस चोहोंकडचे लोक येतात.

## मनमाड.

हें जी. आय. पी. रेलवेचें जंकशन स्टेशन नासिक जिल्ह्यांत आहे. येथून गोदावरी रेलवेनें हैदराबादेस जातां येतें. वाटेंत जालना, औरंगाबाद, दौलताबाद व वेरूळचीं लेणीं हीं प्रेक्षणीय ठिकाणें आहेत. स्टेशनहून ४ मैलांवर एका ८०० फूट उंचीचे टेंकडीवर अंकाई-टांकाईचा प्रसिद्ध किल्ला आहे. ही टेंकडी चढत असतांना वाटेंत कांहीं जुनीं लेणीं व देवळें लागतात. तींही पहाण्यासारखीं आहेत. किल्लचांत स्वच्छ पाण्याचे झरे आहेत. येथून १८ मैलांवर चांदोर हा तालुक्याचा गांव आहे. येथील जुने किल्ले व अहल्याबाईनें बांधलेला राजवाडा हे पहाण्यासारखे आहेत; मनमाड मुंबईहून १६२ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. १० आणे लागतें.

## मायावरम्.

मद्रास इलाख्यांत कावेरीचे कांठीं हा गांव आहे व स्टेशनही आहे. मायावरमास महादेवाचें व श्रीविष्णूचें अशीं देवालयें आहेत. येथील एक यात्रा महिनाभर असते. ७०।८० हजार लोक जमतात. स्टेशनवर खाणावळीची सोय आहे. येथून एक मैलांवर कोरांडू येथें लुगडीं चांगलीं तयार होतात रेशीमकांठी कापड येथें तयार होऊन बाहेरगांवीं पुष्कळ जातें. मायावरम् मद्रासहून १७७ मैल आहे. रेलवेभाडें २ रु. लागतें.

## मियानी.

पंजाबांतील भेरा तहशिलींत झेलम नदीचे कांठीं हा गांव एक मिठाच्या व्यापाराचें ठिकाण आहे. येथील नदीकांठच्या मिठाच्या खाणीमुळें हें ठिकाण फार प्राचीनकाळापासून प्रसिद्ध आहे. मूळचें समशाबाद हें शहर वाहून गेल्यामुळें बादशहा शहाजहान याच्या सासऱ्यानें हा हल्लींचा गांव वसविला. येथून तूपही पुष्कळ बाहेर जातें. शहाशब्बल म्हणून एक मुसलमानांची जत्रा भरते. मियानी लाहोरहून १३६ मैल आहे. रेलवेभाडें १ रु ९ आणे ६ पै लागतें.

## मिर्झापूर.

कलकत्त्यापासून १९८ मैल असून रेलवेभाडें ४ रु १० आणे लागतें.

मिर्झापुरास भागीरथीस मोठे मोठे घाट बांधून काढले आहेत. ते पहाण्यासारखे आहेत. येथें दगडाच्या खाणी पुष्कळ आहेत. येथें लोकरी कापड फार उत्तम तयार होतें. हे माग जरूर पहाण्यासारखे आहेत. पितळ वगैरे धातुकामही चांगलें होतें. विंध्याचल म्हणून एक स्थान येथून जवळ आहे. लोक प्रथम येथेंच उतरत असत. आतां विंध्याचल हें स्टेशन झालें आहे.

## मिसरिख.

हें नांव मूळ संस्कृत शब्द "मिश्रित" यापासून निघालें आहे. हें मूळ दधिची ऋषींचें स्थान आहे असें म्हणतात. देवदैत्यांच्या लढाईंत देवांना यश येईना तेव्हां दधिची ऋषीच्या अस्थि घेऊन त्यांचा शस्त्राच्या ठिकाणीं उपयोग करून यश मिळविलें. अस्थि देण्यापूर्वीं सर्व तीर्थांचें स्नान करण्याची इच्छा आहे असें ऋषीनें सांगितलें तेव्हां देवांनीं सर्व तीर्थांचें पाणी आणून ऋषीस स्नान घातलें. सर्व तीर्थें एकवटल्यामुळें मिश्रित हें नांव पडलें. त्याचा अपभ्रंश हल्लीं मिसरिख असा झाला आहे. येथील तीर्थास १९० वर्षांपूर्वीं मराठे सरदारांनीं चांगली दुरुस्ती केली असून हल्लीं तें चांगल्या स्थितींत आहे. शिमग्यांत मोठा उत्सव होतो. मिसरिख हा गांव अयोध्या प्रांतांतील सितापूर जिल्ह्यांत आहे. सितापूर लखनौहून ५९ मैल आहे. रेलवेभाडें ९ आणे ३ पै लागतें.

## मार्मागोवा.

हें बंदर मद्रास इलाख्यांत आहे व हें स्टेशनही आहे. कॅसलरॉक आणि कोलम् या स्टेशनांचे दरम्यान घाटाचा देखावा आणि कॅसल रॉकपासून ८॥ मैलांवर असलेला दुधसागर हा सुंदर धबधबा हीं ठिकाणें या प्रांतांत पाहण्यासारखीं आहेत. मार्मगोवापासून पणजी सात मैल आहे. पणजी पोर्तुगीज सरकारचें शहर आहे. पणजीपर्यंतचा प्रवास फारच उत्साहदायक आहे. अगाऊ तजवीज केल्यास बोटीची वगैरे सोय चांगली होते. मार्मागोवा पुण्याहून ३६४ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ११ आणे ३ पै. लागतें.

## मुलतान.

हें शहर पंजाबांत आहे. हें इतिहासांत प्राचीन काळापासून प्रसिद्ध

आहे. शहराचे असपास मुसलमानांच्या पवित्र अशा पुष्कळ जागा आहेत. त्यांत बहाउद्दीन व शाहा रुकनी आलम् हीं ठिकाणें प्रसिद्ध आहेत. सिंध व पंजाब प्रांतांतून पुष्कळ लोक येथें येतात. याशिवाय शेर शहा, मखदुम रशीद वगैरे दुसरीं आणखी ठिकाणें आहेत. मुलतान हें सुती, रेशमी व लोंकरी कामाविषयीं अगदीं नामांकित आहे. मुलतान हें लाहोरहून २०७ मैल आहे. रेलवेभाडें २रु. ६आणे ९पै लागतें.

## मथुरा.

हें पुरातन शहर संयुक्तप्रांतांत यमुनेचे कांठीं आहे. हें भगवान कृष्णाचें जन्मस्थान आहे. कृष्ण लहानपणीं नंदाच्या घरीं ज्या ठिकाणीं वाढला तें महावन म्हणून जुनें ठिकाण मथुरेहून सहा मैल आहे. त्या ठिकाणीं नंदाचा वाडा आहे त्यांत यशोदा ताक करीत होती ती माथण व गोपींनीं एकदां कृष्णाची मुरली ज्या ठिकाणीं लपवून ठेवली होती ती जागा हीं आहेत. मथुरेच्या उत्तरेस पांच मैलांवर वृंदावन हें पवित्र ठिकाण आहे. येथें पुष्कळ देवस्थानें आहेत. त्यांत गोविंददेव व गोपीचंद हीं प्रसिद्ध आहेत. वृंदावन हें एक यात्रेचें अतिशय पवित्र व महत्वाचें ठिकाण आहे. गोकुळ महावनापासून सुमारें एक मैलांवर यमुनेच्या कांठीं आहे. हीं सर्व ठिकाणें भगवंताचा या जागेंत बराच कालपर्यंत प्रत्यक्ष वास झाला असल्यामुळें अतिशय पवित्र आहेत, हें सांगण्याचें कारण नाहीं. मथुरेस ठसे दिलेलें कापड पुष्कळ तयार होतें. शहरांत पुष्कळ धर्मशाळा आहेत. मथुरा हें जंक्शन स्टेशन मुंबईहून ८६८ मैल आहे. रेलवेभाडें ९रु. १आणा लागतें.

## ह्मैसूर.

हें म्हैसूर संस्थानच्या राजधानीचें शहर आहे. किल्ल्यांतील राजवाडा, जगनमोहन रामवाडा, व महाराजांचे उष्ण कालांतील वसतिस्थान व येथील इतर सार्वजनिक इमारती प्रेक्षणीय आहेत. दसऱ्याचा समारंभ येथें फार थाटाचा होतो. म्हैसूरच्या आग्नेयेस चमंडी म्हणून डोंगर आहे. डोंगरावर चमंडी देवीचें स्थान आहे. समुद्रसपाटीपासून या डोंगराची उंची ३४८९ फूट आहे. डोगर चढत असतांना वाटेंत खडक कोरून तयार केलेला एक प्रचंड नंदी लागतो. या नंदीची उंची

सुमारें १६ फूट आहे, हा नंदी दोड्डदेवराज राजाच्या कारकीर्दींत तयार केलेला आहे. म्हैसूर हें मद्रास आणि सदर्न मराठा रेलवेचें स्टेशन पुण्याहून ७११ मैल असून रेलवेभाडें ६ रु. १० आणे लागतें.

## यवत.

हें स्टेशन व गांव पुण्याजवळ आहे. स्टेशनहून ४ मैलांवर डोंगरावर बालेश्वर म्हणून महादेवाचें एक स्थान आहे. स्टेशनवर बैलगाड्या मिळतात. यवत मुंबईहून १४९ मैल आहे. रेलवेभाडें १ रु.८ आणे लागतें.

## राजगड.

ही एक डोंगराची रांग बंगाल्यांत पाटणा जिल्ह्यांत आहे. गौतम बुद्धाचें हें एक राहण्याचें ठिकाण होतें असें म्हणतात. येथून जवळच कुशनगरपूर म्हणून एक शहर होतें. हल्लीं याच्या कांहीं कांहीं खाणाखुणा आढळून येतात. त्या ठिकाणीं उष्ण पाण्याचे झरे असून त्यास गंधकाचा वास येतो. राजगडास जाण्यास जामुवान हें जवळचें स्टेशन आहे. जामुवान हें स्टेशन कलकत्त्याहून २०४ मैल आहे. रेलवेभाडें ३रु. ६ आणे ९ पै लागतें.

## रामनद.

मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्यांत हा एक जमिनदारीचा गांव आहे. तिरुपलनी व देवीपट्टणम् या नांवाचीं दोन देवालयें रामनद स्टेशनहून अनुक्रमें पांच व दहा मैलांवर आहेत. देवालयापासून समुद्र सुमारें तीन मैल आहे. रामेश्वरास जातांना समुद्रस्नानास पुष्कळ लोक येथें उतरतात. येथें धर्मशाळा आहेत. स्टेशनवर बैलगाड्या वगैरे मिळतात. रामनद स्टेशन मद्रासहून ४१९ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १० आणे लागतें.

## रामपूर.

अयोध्या प्रांतांत हा एक संस्थानचा गांव आहे व स्टेशन आहे. शहराभोंवतीं बांबूचें दाट आवार आहे. जम्मा मशीद, खुरशिदमंझिल, मच्छीभवान ह्या इमारती येथें पहाण्यासारख्या आहेत. येथें रेशमी कापड तयार होतें. रामपुरला जाण्यास सहारणपुराहून १ रु. १० आणे भाडें लागतें.

## रामटेक.

हें ठिकाण नागपुराहून २४ मैल आहे. रामटेकला जाण्यास बी. एन् रेलवेची ब्रँच लाइन आहे. नागपूरहून रेलवेनें ४॥ आणे पडतात. स्टेशनहून रामटेक गांव ३ मैल असून रामाच्या पहाडाला लागून आहे. ह्या पहाडाला सुंदरागिरी असें म्हणतात. पहाडाखालीं विस्तीर्ण तलाव आहे. भोंवतालीं नागपूरच्या भोसल्यांनीं घाट बांधून काढले आहेत. कांठाला लहान लहान बरींच देवालयें आहेत. ह्या पहाडावर जाण्यास एकंदर ७५० पायऱ्या चढाव्या लागतात. ऊंबरेश्वर, वसिष्ठ व दशरथ, वराहमूर्ति, राम, लक्ष्मण, लहकुश यांचीं देवालयें हीं सर्व ठिकाणें व येथील वनश्री पाहिल्यावर व श्रीरामाचें दर्शन झाल्यावर आराम न वाटणारा मनुष्य दुनियेंत कोण असूं शकेल? गांवाच्या आसपास १०।१२ तळीं आहेत. पहाडावरून शहराचा देखावा फारच मजेचा दिसतो. रामटेकचीं विड्याचीं पानें अतिशय प्रसिद्ध आहेत. हें विड्याचें पान निबर असतें. यामुळें पक्कीं पानें चांगलीं होतात. व तीं पुष्कळ स्वस्त मिळतात. येथें पानांची लागवड अतिशय असून ती सुमारें तीन शतकापासून आहे. येथील विड्याचीं पानें फार लांबवर जातात.

## रामपुरा.

राजपुतान्यांत उदेपूरच्या पश्चिम सरहद्दीवर साद्री खिंडीतही जैनदेवस्थानची एक प्रसिद्ध जागा आहे. हीं देवालयें धर्मसेठ नांवाच्या गृहस्थानें इ. स. १४४० त बांधलीं. त्यांस ७५ लाख रुपये खर्च झाले आहेत. सर्वांत लहान जें देऊळ आहे त्यांत काळ्या संगमरवरी पाषाणाची पारसनाथाची मूर्ति आहे. बाहेरच्या बाजूस पुष्कळ मूर्ति कोरल्या आहेत. सर्वांत मोठें जें देऊळ आहे त्याला ८६ शिखरें आहेत. या ठिकाणीं दरवर्षीं १०००० वर लोक जमतात.

## रेणिगुंठा.

हें जंकशन स्टेशन मद्रास इलाख्यांत आहे. येथून १४ मैलावर चंद्रगिरीच्या तेलगू राजांनीं कित्येक शतकांपूर्वी बांधलेला राजामहाल म्हणून जुना राजवाडा आहे. महालाचें सर्व काम दगडी आहे. लांकडाचा बिलकूल उपयोग केलेला नाहीं. येथील शिल्पकाम वाखाणण्यासारखें आहे. लगतच राममहाल म्हणून दुसरी लहान इमारत आहे. हे महाल चंद्रगिरी पर्व-

ताच्या पायथ्याशीं असून माथ्याशीं विजयनगरमच्या नरसिंगराजानें बांधलेला जुना किल्ला आहे. श्रीव्यंकटेशाचें स्थान येथून ७ मैलांवर तिरुपतीस आहे. रेणिगुंठा मद्रासहून ८४ मैल आहे. रेलवेभाडें १४ आणे लागतें.

## रोहरी.

हा गांव सिंधप्रांतात सिंधुनदाचे कांठीं आहे व तो सय्यद रुकनुद्दीन शाहा यानें सन १२९० त वसविला आहे असें म्हणतात. या ठिकाणीं मुसलमानांच्या पुष्कळ पवित्र जागा आहेत. त्यांत वारमुबारक ही मुख्य आहे. या ठिकाणाची स्थापना महमदाच्या दाढीच्या केंसांप्रीत्यर्थ झाली आहे असें म्हणतात. हे केंस एका सुवर्णकरंडकांत सुगंधी पदार्थ घालून त्यांत ठेवले आहेत. येथील जत्रा फेब्रुवारी महिन्यांत भरते, त्या वेळीं हे केंस पहावयास मिळतात. रोहरीस सिंधुनदास नॉर्थवेस्टर्न रेलवेनें बांधलेला भव्य व विस्तीर्ण लोखंडी पूल अत्यंत प्रेक्षणीय आहे.

## लाहोर.

ही पंजाबची राजधानी आहे. हें हिंदुस्थानांतील एक अती प्राचीन व सुप्रसिद्ध शहर आहे. शहरापासून एक मैलावर रावी नदी आहे. पूर्वीचा नदीचा प्रवाह शहरास लागून होता. इ. स. १६६२ त नदीस अतोनात पाणी आल्यामुळें शहराची फार नासाडी झाली. म्हणून ४ मैल लांबीचा विटांचा बंधारा बांधून काढला. पण पुढें लवकरच प्रवाह जो एकदां उत्तरेच्या बाजूस वळला तो पुन्हां पहिल्या ठिकाणीं आलाच नाहीं. लाहोर प्रथम रजपूत घराण्याकडे होतें. पुढें मोगल साम्राज्यांत अनेक आणिबाणीचे प्रसंग या शहरानें पाहिले आहेत. शिल्पकामापैकीं आतां बघण्यासारखें जें कांहीं आहे तें सर्व मोंगलांच्या कारकीर्दींतील आहे. झमझमा ही सुप्रसिद्ध तोफ सेंट्रल म्यूझियमच्या समोर आहे. ही तोफ १७६१ च्या पानिपतच्या संग्रामांत कामास आली होती. पण ती अतिशय बोजड असल्यामुळें अहमदशहा अबदालीनें काबुलास परत नेली नाहीं. युनिव्हर्सिटी हॉल, कॉलेज, लायब्ररी व सरकारी प्रत्येक खात्याच्या मोठमोठ्या कचेऱ्या व प्राणिसंग्रह असलेल्या बागा पाहण्यासारख्या आहेत. मुसलमानांच्या पुष्कळ मशिदी आहेत. त्यांत दाता गंजबक्ष, शहा महमद घास ह्या फार लोकप्रिय आहेत.

ष्टेशनवर खाणावळी आहेत. लाहोर मुंबईहून १३०६ मैल आहे. रेलवे भाडें १३ रु. ९ आणे लागतें.

## लखनौ.

हें अयोध्या प्रांतांतील मुख्य शहर आहे. या ठिकाणीं लष्कर फार मोठें ठेवलें आहे. मच्छीबावन, इमामबारा, हुसेनाबाद हीं येथील पाहण्यासारखीं ठिकाणें आहेत. पदार्थसंग्रहालय, वेधशाळा व लोखंडी पूल हीं देखील प्रेक्षणीय आहेत. ऐतिहासिक महत्वाचीं ठिकाणें म्हणजे अलमबाग, दिलखुष, केसरबाग, राजवाडा हीं होत. अलमबागेंत ५७ सालांतला सेनापती हावेलाक याचें थडगें आहे. लखनौ हें अयोध्या प्रांताच्या कमिशनरचें राहण्याचें ठिकाण आहे. लखनौ मुंबईहून ८८५ मैल आहे. रेलवेभाडें १० रु. ४ आणे लागतें.

## लुधियाना.

हें पंजाबांत जिल्ह्याचें ठिकाण असून नार्थ वेस्टर्न रेलवेचें जंक्शन आहे. हें लोधी घराण्यापैकीं युसफ आणि निहांग या पादशहांनीं इ. स. १४८० त वसविलें आहे. येथें काश्मिरी व पठाण लोकांची वस्ती विशेष आहे. शेख अबदुल कादर जिलानी म्हणून एक मशीद आहे. रोषनापीरसाहेबाचा मोठा उरूस भरतो. त्या वेळीं जनावरांचा बाजार चांगला भरतो. हें शहर पश्मीना, शाली, कापूस, कापड व पागोटीं यासंबंधीं प्रख्यात आहे. लुधियाना दिल्लीहून २३३ मैल आहे. रेलवेभाडें २ रु. ७ आणे लागतें.

## वेरूळ.

हा गांव निजामचे राज्यांत गोदावरी रेलवेच्या दौलताबाद स्टेशनहून ७ मैलांवर आहे. वेरूळचीं लेणीं जगप्रसिद्ध आहेत. ह्या लेण्याचे तीन भाग असून त्यांत बुद्धांचीं १२ ब्राह्मणांचीं १७ व जैनांचीं पांच अशीं लेणीं आहेत. त्यांत कैलास ही जी इमारत आहे ती सर्वोत्कृष्ट आहे. या संबंधानें फर्ग्युसन साहेब म्हणतात. "The most wonderful and interesting monument of architectural art in India" खेरीज आपल्या सेवकगणासह कमलावरील लक्ष्मी, नंदीचा मंडप व मंडपाच्या दोन्ही बाजूंस असलेले ध्वजानंद म्हणून सुमारें ४५ फूट उंचीचे प्रचंड स्तंभ ह्या प्रेक्षणिय चिजा आहेत. दौलताबाद सिकंदराबादेहून ३३६ मैल आहे.

रेल्वेभाडें ३ रु. ८. लागतें. वेरूळला विश्रांतीगृह आहे. परंतु त्यास औरंगाबादच्या अव्वल तालुकदाराची अगोदर परवानगी घ्यावी लागते.

## विनूकोंडा.

हा गांव व डोंगर मद्रास इलाख्यांतील कृष्णा जिल्ह्यांत आहे. या डोंगरावर एक सुप्रसिद्ध किल्ला आहे. ही टेंकडी समुद्रसपाटीपासून ६०० फूट उंच आहे.

## विझगापट्टम्.

हें समुद्रकांठीं एक बंदर आहे. डच लोकांची वसाहत प्रथम या ठिकाणीं होती. नंतर इंग्रजांकडे आलें. कांहीं दिवसपर्यंत विझगापट्टम् हें इंग्रजांचें कारोमांडल किनाऱ्यावरील एक मजबूत ठाणें होतें. हस्तीदंती कामाबद्दल या शहराची ख्याती आहे. विझगापट्टम् हें स्टेशन रायापुरम्हून ४८७ मैल आहे. रेल्वेभाडें ६ रु. ६ आ. लागतें.

## विजापूर.

हा जिल्ह्याचा गांव असून फार जुनें शहर आहे. विजापूरच्या आदिलशाही कारकीर्दीतील अनेक जुन्या इमारती प्रेक्षणीय आहेत. त्यांत बोळघुमट, जुम्मामशीद, उपरी बुरूज, तासबावडी, मुलुख मैदान तोफ, हीं प्रमुख आहेत. बोळघुमट स्टेशनाहून दहा पांच पावलांवर आहे, इमारत फारच भव्य, अतिशय उंच व विस्तीर्ण आहे. घुमटाच्या गाभाऱ्यांत ध्वनीला प्रतिध्वनी सात आठ वेळां स्पष्ट ऐकूं येतो. ही मौज पाहिल्यावर कोणालाही हंसू आल्याखेरीज रहात नाहीं. बोळघुमट ही एक जगांतील अप्रतीम चीज आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. जुम्मा मशीद ही फारच मोठी मशीद आहे म्हणजे हींत एकाच वेळीं दोन हजारांहून अधिक माणसें प्रार्थनेस सहज उभीं राहूं शकतात. असारमहाल ही बादशहाचे वेळची दरबारची जागा होती असें म्हणतात. शेजारींच आनंदमहाल, गगनमहाल हे पूर्वींच्या राजवाड्याचे भाग आहेत. तासबावडी ही एक अतिशय मोठी विहीर आहे. इब्राहीम रोजा नांवाची इमारत फारच नक्षीदार आहे. यांत बादशहा इब्राहिम वगैरेचीं थडगीं आहेत. ह्या इमारतीवर फारशी लिपी कोरलेली आहे. जवळच मुलुख मैदान ही प्रचंड तोफ आहे. तोफेवर ती महमद बिन

हसनरुमी या तुर्क गृहस्थानें इ. स. १५४९ तयार केली असा उल्लेख आहे. ही पंच धातूची असल्यामुळें आजची अगदीं नवीन असल्यासारखी आहे. याशिवाय उपरी बुरुज, मेहतरमहाल इत्यादी अनेक इमारती आहेत. त्या सर्वांचें येथें सविस्तर वर्णन करणें अशक्य आहे. विजापूर प्रांतांत कापूस चांगला पिकतो. विजापुरास जोडे चांगले तयार होतात. विजापूर होटगी जंक्शनहून ५६ मैल आहे. रेलवेभाडें मुंबईहून होटगी-मार्गें ३ रु. १० आणे ९ पै लागतें.

## शहादारा.

हा गांव लाहोरहून ३ मैलांवर रावीचे कांठीं आहे. या ठिकाणीं एका सुंदर बागेंत बादशहा जहांगीर व नूरजहान आणि नूरजहानचा भाऊ असफखान यांचीं थडगीं आहेत. लाहोरच्या लोकांचें हें एक आवडतें राहण्याचें ठिकाण आहे. येथील संगमरवरी शिल्पकाम शीख लोकांनीं आपल्या अमृतसर येथील देवालयाकरितां काढून नेलें असें सांगतात. शहादारा हें लाहोरहून दुसरें स्टेशन आहे. रेलवेनें १ आणा लागतो.

## शिमोगा.

हा जिल्ह्याचा गांव असून स्टेशन आहे. सुप्रसिद्ध गिरसापाचा धबधबा येथून ६४ मैलांवर आहे. उंची व सौंदर्य या दोन्ही दृष्टींनीं गिरसापाच्या धबधब्याचा साऱ्या जगांत पहिला नंबर आहे. या धबधब्याचे चार प्रवाह असून त्यांस राजा, राणी, रोअरर, म्हणजे गर्जना करणारा व रॉकेट अशीं निरनिराळीं नांवें आहेत. राजा हा प्रवाह सुमारें ८३० फूट उंचीवरून खालीं पडतो. येथील एकंदर देखावा साऱ्या जगांत अप्रतिम आहे. हा धबधबा पाहण्यास हिंवाळ्याचे दिवस चांगले. म्हैसूरसरकारचा टपालटांगा शिमोग्याहून सागरला रोजीं जातो. दरमाणशीं एका वेळचें भाडें ३ रु. आहे. सागर शिमोग्याहून ४५ मैल आहे. सागराहून गिरसापास गाडीची सोय सागर येथील अमलदारास निदान आगाऊ २४ तास कळविलें असतां होते. धबधब्याजवळ दोन बंगले आहेत. शिमोगा पुण्याहून ५३२ मैल आहे. रेलवेभाडें ५ रु. ८ आणे ९ पै लागतें.

## श्रीरंगपट्टण.

ही म्हैसूरची पहिली राजधानी होय. हें शहर कावेरी नदींतील एका

बेटावर बसलेलें आहे. येथील किल्ला ऐतिहासिकरीत्या महत्वाचा आहे. कारण, इंग्रजांच्या व टिपूच्या अनेक उलाढाली या किल्ल्यावर झालेल्या आहेत. किल्ल्याच्या पूर्वेस दारिया दौलत बागेंत टिपूचा उन्हाळ्यांत रहाण्याचा राजवाडा आहे. लालबागेंत एक घुमट आहे. तो टिपूनें आपल्या बापाकरितां बांधिला. टिपूचें शवही याच ठिकाणीं पुरलें आहे. आंतल्या बाजूस हस्तिदंतानें जडवलेले येथील टेंभुरणीच्या लांकडाचे दरवाजे लॉर्ड-डलहौसी यांनीं दिलेले आहेत. हैदरचें थडगें असलेला बाग व स्टेशन यांत अंतर ३ मैलांचें आहे. श्रीरंगपट्टण म्हैसुराहून ९ मैल आहे. रेलवे भाडें म्हैसूराहून १ आणा ६ पै. लागतें.

## श्रीनगर.

ही काश्मीरची राजधानी आहे. झेलमनदी शहरांतून बरोबर मधोमध वहाते. नदीस सात पूल बांधून काढल्यामुळें शहराच्या दोन्ही भागांतून परस्पर दळणवळण चालतें. शहराचा महाराजगंज म्हणून जो मोठा बाजार आहे तेथें काश्मीरांत होणाऱ्या अनेक चिजा तयार मिळतात. शहराच्या ईशान्येला ५ मैल लांबी व २॥ मैल रुंदीचा असा एक विस्तीर्ण तलाव आहे. या तलावावर पुष्कळ बगीचे असून कलिंगडें, खरबुजें व कांकड्या यांचें पीक तेथें मनमुराद येतें. शालीमारबाग, नासिम बाग व निशतबाग हे बगीचे प्रेक्षणीय आहेत. बारादारी, किल्ला, राजवाडा व तखो सुलेमान पर्वतावरील श्रीशंकराचार्यांचें देवालय हीं ठिकाणें पाहाण्यासारखीं आहेत. गुलमार्ग हें हवाशीर ठिकाण येथून २८ मैल आहे. श्रीनगरहून तट्टे मिळतात. पंजाबांतून काश्मीरास जाण्याचे पांच मार्ग आहेत. त्यांत मरीहून जाणें सोयीचें आहे. मरी व रावळपिंडी येथेंही एक्के व टांगे मिळतात. टांगा-भाडें दरमाणशीं रावळपिंडीहून श्रीनगरास रुपये ४५ लागतें. एक्क्यास माणशीं २५ ते ३० रु. पडतात. रावळपिंडीहून श्रीनगरास पोंहोचण्यास ५ दिवस लागतात. वाटेनें विश्रांतिगृहें आहेत. रावळपिंडी स्टेशन मुंबईहून १२७८ मैल आहे. रेलवेभाडें १२ रु. ९ आणे लागतें.

## शृंगेरी.

हें पवित्र स्थान म्हैसूर संस्थानांत आहे. गांवास तुंगा नदी आहे. विभांडक ऋषीनें तप याच ठिकाणीं केलें व ऋष्यशृंगाचा जन्म येथेंच

झाला अशी आख्यायिका आहे. शृंगेरी हें जगद्गुरु शंकराचार्यांचें आदि-पीठ आहे. आद्य शंकराचार्यांनीं शारदांबेची मूर्ति काश्मीराहून आणून स्थापिली आहे. शृंगेरी मठ सर्व मठांच्या अग्रभागीं आहे. तुंगेच्या कांठची बरीच जमीन मठाकडे प्राचीन कालापासून आहे. शिवाय म्हैसूर संस्थानाकडून मठास दरमहा १५०० रुपयांची नेमणूक आहे. शारदांबेचें देवालय ज्या टेंकडीवर आहे तिला शृंगेरी असें नांव आहे. वर्षांतून अनेक उत्सव होतात. दरवेळीं १०००० पर्यंत लोक जमतात. सर्व खर्च मठाकडून होतो. उत्सवांत दानधर्म पुष्कळ होतो. शृंगेरी गांव कडूर स्टेशनाहून ५५ मैल आहे. कडूर हें जिल्ह्याचें ठिकाण आहे. कडूरास बैलगाड्या मिळतात. कडूर हें स्टेशन बेंगळूरपासून १२८ मैल आहे. रेलवेभाडें १ रु. ५ आ. ३ पे. लागतें.

## श्रीरंगम्.

त्रिचनापल्लीहून दोन मैलांवर कावेरी नदींतील एका बेटावर हें शहर आहे. बेटावर जाण्यास पूल बांधून काढला आहे. येथील विष्णूच्या विस्तीर्ण देवालयामुळें हें ठिकाण फार प्रसिद्ध आहे. हें देवालय पूर्ण बांधलेलें नाहीं. त्याची सध्यांची उंची मरासरी २०० फूट आहे. जर तें पूर्ण झालें असतें तर त्याची उंची ३०० फुटांच्याही वर गेली असती. श्रीरंगमास बगीचे व तळीं अनेक आहेत. देवालयाची एकंदर रचना श्रीविष्णूचें आवडतें स्थान जें वैकुंठ त्यासारखी आहे असें मानतात. श्रीरंगम् हें विशिष्टाद्वैत-मताचे उत्पादक रामानुजाचार्य यांचें राहण्याचें ठिकाण असल्याविषयीं प्रसिद्ध आहे. रामानुजांनीं वयाचे १२० वे वर्षी समाधी घेतली. विष्णूचे देवालयांत एका ठिकाणीं रामानुजाची मूर्ति आहे. त्रिचनापल्ली जंक्शन मद्रासबीच जंक्शनहून २१६ मैल आहे. रेलवेभाडें २ रु. १३ आ. लागतें.

## श्रीक्षेत्र रामेश्वर.

हें पवित्र क्षेत्र हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकास रामनंद जमीनदारींत आहे. रामेश्वर हें बेट आहे. रामेश्वर व मुख्य भूप्रदेश यांच्यामध्यें पंबनची खाडी आहे. ह्या बेटाचें एकंदर क्षेत्रफळ लांबी सुमारें ११ मैल व रुंदी ६ मैल आहे. येथील लिंगाची स्थापना प्रत्यक्ष भगवान् श्रीरामचंद्रानें केली असल्यामुळें येथील महत्त्व कांहीं अपूर्व आहे. काशीहून भागीरथी

आणून रामेश्वरास घातली व रामेश्वराचा सेतु प्रयागास भागीरथीमध्यें टाकला म्हणजे एक यात्रा पुरी झाली. रामेश्वराचें देवालय फारच विस्तीर्ण म्हणजे लांबी सुमारें १००० फूट व रुंदी ६५७फूट असून येथील सभामंडपाचें खोदीव काम अप्रतीम आहे. देवालयाची खरी कल्पना प्रत्यक्ष दर्शनाखेरीज येणें जवळ जवळ दुरापास्त आहे. रामेश्वरला एकंदर सहा धर्मशाळा आहेत. व त्याठिकाणीं रहावयाची व जेवण्याची चांगली सोय आहे. रामेश्वर बेटावर रेलवे असून रामेश्वर हें स्टेशन मद्रासहून ४४८ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १५आणें लागतें. स्टेशनवर बैलगाड्या मिळतात व पंडे लोकांची खूप गर्दी असते.

## श्रीक्षेत्र काशी.

मुंबईहून ९३८ मैल आहे. हें पृथ्वीवरील एक अति पवित्र क्षेत्र भागीरथीचे कांठीं आहे. काशीविश्वेश्वराचें देवालय जमिनीवर नसून महादेवाच्या त्रिशूळावर बांधलें आहे असें सांगतात. गंगा नदी सर्वत्र पवित्र असली तरी काशीस तिचें महत्व अधिक आहे. पंचक्रोशी मृत्यु आला असतां स्वर्गप्राप्ति होते अशी समजूत आहे. काशीचें अखिल माहात्म्य काशीखंड पुराणांत वर्णिलेंच आहे. येथें जीं अनेक देवालयें आहेत त्यांत विश्वेश्वर, भैरवनाथ आणि दुर्गा हीं प्रमुख आहेत. श्री विश्वेश्वर हें येथील मुख्य दैवत होय. मानमंदिर म्हणून जी वेधशाळा आहे. तेथून विश्वेश्वराचें देवालय जवळ आहे. विश्वेश्वराचे समोर अन्नपूर्णेचें देवालय आहे. शिवाय अनेक तीर्थें व घाट आहेत, त्यांत अशिसंगम, दशाश्वमेध, मणिकर्णिका घाट, पंचगंगा घाट आणि वारणा संगम हे मुख्य आहेत. तीर्थांत मणिकर्णिका, पिशाचमोचन, अगास्तिकुंड हीं प्रसिद्ध आहेत. ज्ञानवापी, अमृतकुंड, नागकुंड हीं दुसरीं तीर्थें आहेत. या तीर्थांत स्नान केल्यापासून मनुष्य अनेक आध्यात्मिक व आधिदैविक व्याधींपासून मुक्त होतो. नवीन इमारतीं पैकीं विजयागरम राजानें बांधलेला टाऊनहाल, दवाखाना, आंधळ्यांकरितां राजा काळीशंकर यांनीं बांधलेला अनाथाश्रम, सेंट्रल हिंदु कॉलेज व सरकारी कचेऱ्या ह्या पाहाण्यासारख्या आहेत. काशी स्टेशनावर धर्मशाळा आहे. मनुष्य जन्मास आल्यावर एकदा तरी काशीयात्रा करावी

एवढें काशीचें महात्म्य आहे. कलकत्त्याहून काशी ४२६ मैल आहे. रेलवे भाडें ४ रु. ६ आ. ६ पै लागतें.

## सोलापूर.

हा जिल्ह्याचा गांव असून वाढतें व्यापारी शहर आहे. सुताच्या व कापडाच्या मिळून सहा गिरण्या हल्लीं चालत असून यांत कापड चांगलें तयार होतें. सोलापुरी धोतरजोडा टिकाऊ असतो, अशाविषयीं सोलापूरची प्रसिद्ध आहे. येथें लिंगायत समाज बराच मोठा आहे. व त्यांचेंच सिद्धेश्वर म्हणून महादेवाचें देवालय आहे. हें देवालय एका लहानशा तळ्याच्या मध्यभागीं असल्यामुळें फार शोभायमान दिसतें. मकर संक्रांतीस मोठी यात्रा भरते. त्यावेळीं देवळाजवळ एक महिनाभर मोठा बाजार असतो. या बाजारांत पाळीव जनावरें फार चांगलीं येतात. देवालयास लागून विजापूरकरांनीं सुमारें ४०० वर्षांपूर्वीं बांधलेला किल्ला आहे. मकरसंक्रांतीचे प्रसंगीं शेतकी प्रदर्शन भरविण्याचीही व्यवस्था अलिकडे जिल्हाधीशांनीं केली आहे. शहरास पाण्याचा पुरवठा हिपरगा तलावापासून होतो. हा तलाव सोलापूराहून तीन मैलांवर आहे. तलावाचा एकंदर परिघ सुमारें सात मैल असून याचे जे पाट काढून नेले आहेत त्या पाटाच्या पाण्यावर डोमगांव वगैरे बाजूच्या बऱ्याच जमीनींचीं पिकें तयार होतात. स्टेशनवर धर्मशाळा आहे. सोलापूर मुंबईहून २८३ मैल असून रेलवेभाडें २ रु. १५ आणे. लागतें.

## साहदोल.

हें बंगाल नागपूर रेलवेचें स्टेशन कलकत्त्याहून ५६५ मैल आहे. रेलवेभाडें ६ रु १ आ. ३ पै. लागतें. स्टेशनाहून थोडक्याशा अंतरावर सोहागपूर म्हणून गांव आहे. हें पूर्वीं विराटपूर म्हणून मोठें शहर होतें. अज्ञातवासांत पांडव याच विराटनगरांत राहिले होते. पांडवांनीं आपलीं शस्त्रें ज्या शमीचे झाडावर लपवून ठेविलीं होतीं तें झाड अद्यापि आहे. दसऱ्याच्या समारंभास त्याची पूजा वगैरे मोठी थाटाची होते. बाणगंगा म्हणून एक तीर्थ व कीचकाचें देऊळ हीं दोन जुनीं ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. येथें थोडाबहुत कोळसाही सांपडतो.

## सांची.

हा गांव भोपाळ संस्थानांत असून जी. आय्. पी. रेलवेचें स्टेशन आहे. येथें बुद्धांचे अनेक अवशेष आहेत. स्टेशनहून पंधरा मिनिटांच्या रस्त्यावर एका टेंकडीवर एक अति प्राचीन बुद्ध स्तूप आहे. सांची व सांचीचे आसपास बुद्धांचे अनेक विहार वगैरे प्राचीन अवशेष अद्यापि विपुल आढळतात. फाहियान या चिनी प्रवाशानें आपल्या प्रवासवर्णनांत सांचीचा "शहाची" या नांवानें उल्लेख केलेला आढळतो. सांची हें स्टेशन मुंबईहून ५४९ मैल आहे. रेलवेभाडें ६ रु. लागतें.

## सारनाथ.

हें स्थान काशीच्या उत्तरेस साडेतीन मैलांवर असून बुद्ध गयेच्या खालोखाल दुसरें पवित्र ठिकाण आहे. सांख्य मुनीनें आपल्या मताचा फैलाव प्रथम येथेंच केला. हल्लीं जे कांहीं जुने अवशेष आढळून येतात ते बहुतेक सांख्य मुनीच्या वेळचे म्हणजे इ. स. पूर्वी ५४३ वर्षांचे आहेत. त्यांत धामक नांवाचा बुरूज व दुसरे स्तूप प्रसिद्ध आहेत. काशी लखनौहून १९९ मैल आहे रेलवेभाडें २ रु. ९ पै लागतें.

## सौंदत्ती.

बेळगांव जिल्ह्यांतील परसगड तालुक्यापैकीं हा एक मुख्य गांव आहे. हा गांव धारवाड स्टेशनहून २४ मैल आहे. सौंदत्तीपासून दोन मैलांवर परसगड म्हणून सुप्रसिद्ध डोंगरी किल्ला आहे. सौंदत्तीहून साडेपांच मैलांवर यल्लमा देवीचें स्थान आहे. तेथें वर्षांतून दोनदा यात्रा भरते. दोन्हीं खेपेस १५।२०००० लोक जमतात. असें सांगतात कीं, यल्लमा ही ऋषिपत्नी होती व तिला तीन मुलें होतीं. कांहीं अवज्ञा झाल्यामुळें ऋषीनें आपल्या मुलांस तिचा वध करण्यास सांगितलें, सर्वांत धाकट्या मुलानें बापाची ही आज्ञा पाळिली व त्याच्याच विनंतीवरून पुन्हां तिला सजीव केलें. नंतर तिनें एकनिष्ठपणें सेवा करून पतिचें प्रेम पुन्हां संपादन केलें. येथील मुख्य पैदास म्हणजे कापूस. धारवाड पुण्याहून ३२१ मैल आहे. रेलवेभाडें ३ रु. ५ आणे ९ पै लागतें.

## सेवरी नारायण.

मध्यप्रांतांत बिलासपुराहून ३९ मैलांवर महानदीचे कांठीं हा गांव

आहे. शिलालेखावरून पहातां येथील नारायणाचें देवालय इ. स. ८४८ चे सुमारास बांधलें असावें. पावसाळ्यांत महानदीचें पात्र फारच विस्तीर्ण होतें. संबळपुराहून बोटी चालतात. सेवरी नारायणास जाण्यास बंगाल नागपूर रेलवेचें नैला हें जवळचें स्टेशन आहे. परंतु येथून रस्ता चांगला नसल्यामुळें प्रवाशांनीं बिलासपुरास उतरून जावें. बैलगाड्या मिळतात. बिलासपूर कलकत्त्याहून ४४५मेल आहे. रेलवेभाडें ४रु. १२ आ. ६पे. लागतें.

## सिंगणापूर.

मुंबईइलाख्यांत सातारा जिल्ह्यांतील माण तालुक्यांत हा गांव आहे. कोरेगांव हें जवळचें स्टेशन येथून ४० मेल आहे. कोरेगांवाहून सिंगणापूरला जाण्यास बैलगाडीनें ५ रुपये लागतात. सिंगणापूर हा गांव डोंगराच्या कोंपऱ्यांत वसलेला आहे. या डोंगरास शिखर सिंगणापूर असें म्हणतात. शिखर सिंगणापूर हें महादेवाचें स्थान सातारा प्रांतांत अतिशय प्रसिद्ध आहे. येथें ५०००यात्रा भरते. कोरेगांव स्टेशन पुण्याहून ८४ मेल आहे. रेलवेभाडें १२ आणे लागतें.

## सिद्धपूर.

अहमदाबादचे उत्तरेस ६४ मैलांवर बडोदा संस्थानांत सरस्वती नदीचे कांठीं आहे. सिद्धपूरास "मातृ गया" असें म्हणतात. रुद्रमाळा म्हणून महादेवाचें सुप्रसिद्ध देवालय आहे. ह्या देवालयाच्या शिल्पकामाबद्दल अनेक मार्मिक इंग्रज गृहस्थांनीं देखील फारच तारीफ केली आहे. केवलपुरी गोसाव्याचा मठ म्हणून एक भली मोठी इमारत आहे. गुजराथेंतील पाटण हें शहर येथून १५ मैल आहे. स्टेशन जवळच धर्मशाळा आहे. सिद्धपूर हें बी. बी. सी. आय. रेलवेचें स्टेशन मुंबईहून ३७४ मेल आहे. रेलवे भाडें ४ रु. लागतें.

## सिमला.

ही हिंदुस्थान सरकारची उन्हाळ्यांतली राजधानी आहे. कलकत्त्याचे गव्हर्नर जनरल व बडे बडे अंमलदार उन्हाळ्यांत या ठिकाणीं रहावयास जातात. कौन्सिलच्या बैठकीही केव्हां केव्हां येथें होतात. सिमला हें हवाशीर ठिकाण हिमालयांत असून समुद्रसपाटीपासून ७०८४ फूट आहे.

सिमल्यास पहिला बंगला लेफ्टेनंट रॉस या साहेबांनीं सन १८१९ मध्यें बांधला. नंतर ही वसाहत सारखी झपाट्यानें इतकी वाढत गेली कीं, सन १८२७ सालीं त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड ॲमहर्स्ट यांनीं उन्हाळा येथें काढला. येथें प्रवाशांकरितां धर्मशाळा आहे. चोवीस तासाला आठ आणे भाडें द्यावें लागतें. सिमल्यास रेलवे झाली आहे. सिमला कलकत्त्याहून ११३९ मैल आहे. रेलवे भाडें १४ रु. १ आणा लागतें.

## सोमनाथ.

काठेवाडांत जुनागड संस्थानांत हें एक जुनें शहर वेरावळ बंदरानजीक आहे. ऐतिहासिक व धार्मिक अशा दोन्ही दृष्टींनीं हें स्थान महत्वाचें आहे. सोमनाथ हें विस्तीर्ण व सुप्रसिद्ध महादेवाचें देवालय समुद्रकांठास आहे. देवळाच्या मागें थोड्या अंतरावर भातकुंड म्हणून तीर्थ आहे. हें कृष्ण निजधामास गेल्याची जागा असें म्हणतात. सोमनाथाचे आसपासचे प्रदेशांत कृष्णलीलांचीं ठिकाणें आहेत. खेरीज दुसरीं पुष्कळ देवालयें आहेत. आठव्या शतकांत हें रजपुतांच्या ताब्यांत होतें. पुढें सन १०२४ व २६ त महमद गझनीनें केलेली स्वारी व या देवालयाची केलेली लूट इतिहासांत प्रसिद्धच आहे. दाराचीं लांकडी व लोखंडी कुलुपें तयार होत असल्याविषयीं सोमनाथची विशेष प्रसिद्धी आहे. सोमनाथास देवीपट्टण, प्रभासपट्टण किंवा पट्टणसोमनाथ असेंही म्हणतात. वेरावळ स्टेशन भावनगराहून १७८ मैल आहे. रेलवेभाडें २ रु. ९ आणे लागतें.

## सोनेपूर.

बंगाल्यांत सारण जिल्ह्यांत भागीरथी व गंडकी यांच्या संगमावर हा गांव आहे. श्रीविष्णूनें गजेंद्रमोक्ष याच ठिकाणीं करून याचा उद्धार केला अशी कथा आहे. हत्ती, घोडे वगैरेंचा व्यापार येथें मोठा होतो. खुद्द सोनेपुरास धर्मशाळा नाहीं. सोनेपूर हें जंक्शन स्टेशन असून तें कटिहर जंक्शनपासून १७० मैल आहे. रेलवेभाडें १ रु. ६ आणे लागतें.

## सोरन.

हें रोहिलखंड कुमान रेलवेचें स्टेशन कानपुरहून १६२ मैल आहे. रेलवे भाडें १ रु. २ आणे लागतें. मथुरा झाल्यानंतर यात्रेकरू सोरनला येतात. सोरनपासून दोन मैलांवर भगीरथाची गुंफा आहे. सगरपुत्रांचा

उद्धार करण्याकरितां व त्या योगें एकंदर भारतवर्षाच्या कल्याणाकरितां भागीरथीस स्वर्गांतून खालीं आणण्याकरितां भगीरथानें हजारों वर्षें तप केलेली हीच गुंफा असें म्हणतात. येथें एकंदर सहा धर्मशाळा आहेत. धान्याचा व्यापार बराच चालतो.

## हरिद्वार.

हें स्थान हिमालयांत आहे. शैव व वैष्णव या दोन्ही पंथांमध्यें येथील नांवासंबंधानें बराच वाद आहे. शैव हरद्वार म्हणतात तर वैष्णव हरिद्वार असें म्हणतात. महाराज कपिल मुनींनें या ठिकाणीं तप केलें म्हणून कपिलस्थान असेंही ह्मणतात. चदीपहार, मायादेवी व सर्वनाथ हीं तीन प्रमुख देवालयें आहेत. हरीका-शरण अथवा हरी-कापारी म्हणून मुख्य घाट आहे. घाटावर श्रीविष्णूचीं पावलें आहेत. जवळच गंगाद्वार म्हणून देऊळ आहे. दर वर्षी वैशाख शुद्ध प्रतिपदेस म्हणजे गंगा ज्या दिवशीं पृथ्वीवर प्रगट झाली त्या दिवशीं व कुंभ मेळ्याचे वेळीं फार मोठी यात्रा जमते. कनखल हें पवित्र स्थान येथून २ मैल आहे. हरिद्वार सहारणपुराहून ४९ मैल आहे. रेलवेभाडें ११ आ. ३ पै लागतें.

## हस्तिनापूर.

हें महाभारतकालीं कौरवसाम्राज्याचें राजधानीचें शहर असल्याविषयीं पुरातनकालापासून प्रसिद्धच आहे. हें शहर मूळ भरतवंशांतील हस्तिन राजानें वसविलें म्हणून हस्तिनापूर म्हणतात. कौरवपांडवांचा भयंकर रणसंग्राम या ठिकाणींच झाला. जुनें शहर सांप्रत नामशेष झालें आहे. सध्या जें खेडें आहे तें मीरतपासून २२ मैलांवर आहे. कार्तिक महिन्यांत जैन साधूप्रीत्यर्थ मोठी यात्रा भरते. येथें जैनांचीं दोन देवालयें आहेत. मीरत स्टेशनवर हस्तिनापुरास जाण्यास बैलगाड्या मिळतात. दोन्ही खेपेचे मिळून बैलगाडीस १२ रु. पडतात. मिरतस्टेशन दिल्लीहून नॉर्थ वेस्टर्न रेलवेनें ४१ मैल आहे. रेलवेभाडें ७ आणे ९ पै लागतें.

## हुशंगाबाद.

हें जी. आय. पी. चें स्टेशन मुंबईहून ४७६ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. १५ आणे ९ पै पडतें. हें कमिशनरचें रहाण्याचें ठिकाण आहे. स्टेशनला लागूनच गांव आहे. गांवाला नर्मदा नदी आहे. येथें नदीस

फारच घाट बांधलेले आहेत. घाटावर महादेवाचें देवालय आहे. नर्मदेस स्नानास हमेशा शेंकडों लोक येतात. नदीचे कांठावर एक धर्मशाळा आहे. येथील बोरें गोड असतात व तीं स्वस्त मिळतात. भाजीपाला चांगला मिळतो. गांवांत एक कोंकणस्थाची खाणावळ आहे. पाषाणशिला येथून बाहेरगांवीं जातात.

## होसपेट.

हें मद्रास आणि सदर्न मराठा रेलवेचें स्टेशन पुण्याहून हुबळी मार्गें ४२३ मैल आहे. रेलवेभाडें ४ रु. ६ आणे ६ पै लागतें. स्टेशनहून सात मैलांवर तुंगभद्रेच्या कांठीं हंपी हें जुनें शहर आहे. ही विजयानगरच्या राजांची राजधानी होती. विजयानगरच्या कारकीर्दींत या शहरांत अनेक देवालयें व राजवाडे होते. सिझर फ्रेडरिक नांवाचा इंग्रज प्रवासी आपल्या प्रवासवर्णनांत असें लिहितो कीं, विजयानगरच्या राजवाड्यासारखा ज्यास नऊ दरवाजे आहेत असा राजवाडा आपण कधींच पाहिला नाहीं. अद्यापि जे अवशेष आहेत त्यांत विठोबाचें देऊळ, राजवाडा, हत्तीचा तबेला इत्यादि अनेक प्रेक्षणीय ठिकाणें आहेत. नदीस पाणी जेव्हां भरपूर येतें तेव्हां येथील हवा फारच रोगट असते. स्टेशनवर बैलगाड्या मिळतात.



श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगांची



## साथ गाथा.

लेखकः—ह. भ. प. विष्णुबुवा जोग. अर्थ विस्तृत, टाईप सुवाच्य, एकंदर पृष्ठें १५५० वर. अर्थाचे अभंग ४१४१व क्षेपक ४०७एकूण४५००अभंग. बांधणी कापडी जाड पुठ्ठयाची. पुस्तकाचे भाग दोन. एवढ्या प्रचंड ग्रंथाची दोन्ही भाग मिळून किंमत

ट. व्ही. पी. खर्च] **सव्वादोन रुपये** [८९ शिवाय पडेल.

## स्वस्तपणाची इतकी परमावधी

मराठी पुस्तकमालेंत अजून कोणींही केली नाहीं.

**के. रा. गोंधळेकर, जगद्धितेच्छु प्रेस पुणें सिटीः**

॥ ॐ नमः श्रीरामचंद्राय ॥

# आर्यमहौषधालय मु० आंजलें.

**आमचीं रामबाण औषधें पूर्ण मुदतींपर्यंत सेवन करूनही त्यांचा गुण शेंकडा एक दोन रोग्यांस कदाचित् आला नाहीं तर त्यांच्या आरोग्यार्थ आणखी एखादें उत्तम औषध त्यांस फुकट देऊं, परंतु टपालखर्च मात्र त्यांजवर पडेल. ही सवलत आमच्या आजलें येथील मुख्य कारखान्यांतून औषधें नेण्यासच दिली आहे.**

## महत्वाची सूचना.

आह्मी यथाशास्त्र तयार केलेल्या औषधांची सविस्तर माहिती ज्यास पाहिजे असेल त्यांनीं वैद्यकीय माहितीनें परिपूरित व शारीरिक आकृति दाखविलेलें आमच्या क्याटलागाचें सचित्र मोठें पुस्तक मुद्दाम मागवावें. तें फुकट पाठवूं. शेवटीं ग्राहकांस एवढीच सूचना आहे कीं, आमच्या औषधांसारखी गुणविशिष्ट नांवें आणि बहुतेक आमच्याच सहीसारखी सही असलेल्या औषधांच्या बऱ्याच जाहिराती प्रस्तुत अनेक वृत्तपत्रांतून असतात. परंतु त्यांच्याशीं आमचा कोणतेही प्रकारें संबंध नाहीं.

# मदनविलासामृतसंजीविनी.

**वीर्यस्तंभक, रक्तशोधक, अत्यंत कामोत्तेजक, चित्तोत्साहक, बुद्धि-कांतिवर्धक, व पूर्ण धातुपौष्टिक-सुवर्णमाक्षिक-मौक्तिक-कस्तुरी-प्रवालादिमिश्रित अपूर्व गुटिका.**

या सेवन केल्यानें कडकी, इंद्रियशिथिलता, नपुंसकत्व, जीर्णज्वर, अग्निमांद्य, अशक्तता, स्वप्नजन्य किंवा इतर धातुपात, छातीचे रोग, मेंदूचे विकार, बाळंतरोग, पांडु, क्षय, मूत्रसंकोच किंवा मूत्रातिरेक, कटिशूळ, वातरोग औपदंशिक मुरलेले विकार, हात, पाय, मूत्राशय, व शरीर यांचा दाह व अरुची इ० अनेक विकार नवीन किंवा जुनाट असले तरी खात्रीनें व त्वरित बरे होतात. पथ्यसेवनाची जरूर मुळीं नसते. या पाहिजे त्या दिवसांत घेतल्या तरी हटकून गुण करितात, यामुळें यांचा अतिशय खप सुरू आहे. गुटिका रुपयाचे आंत मिळणार नाहींत. त्या एक दम सहा रुपयांच्या किंवा अधिक घेणारांस टपालखर्च माफ. त्याचे आंत घेणारांस ट. ख. वेगळा चार आणे पडेल. एकदम ३२ गो. १ रु., ७० गो. २ रु., १६० गो. ४ रु., २६० गो. ६ रु. व ५२० गो. १० रुपये.

**थंडगार नेत्रांजन**—यानें वडस, सारा, फुलें, खुपऱ्या, बिंदु, काच इ. डोळ्यांचे एकंदर विकार ताबडतोब बरे होऊन दृष्टि तीव्र व थंडगार रहाते. ड. १॥ रुपया.

**कर्णस्रावनाशक अप्रतिम तैल**—यानें कानाचे सर्व प्रकारचे व्रण व तत्संबंधीं इतर विकार त्वरित बरे होतात. बा० १ रुपया.

**परम्यावर अपूर्व मिश्रण**—हें कसलाही नवा किंवा जुना परमा त्याच्या सर्व विकारांसह अगदीं जलद बरा करण्याचें कामीं रामबाण आहे बा. १ रु.

**दंतरक्षक पूड**—ही दांत व हिरड्या यांचे सर्व विकार तात्काळ दुरुस्त करून दांत स्वच्छ व मजबूत करण्यांत प्रतिज्ञेची आहे. ड० ०६ आणे.

**गजकर्ण, खरूज, नायटे**—इ० विकार तीन दिवसांत खास बरे होतात. डबीस ०६ आणे.

**विंचवाचें विष**—हें औषध चोळतांच साफ उतरतें. तें चाळीस मनुष्यांस पुरतें. ड० ०६ आणे.

**गर्मी ( उपदंश )**—संबंधीं चट्टे व त्याचे सारे दोष या मलमानें जलद बरे होतात ड० २ रुपये.

**चातुर्थिक ताप**—कसाही असो. तो तीन पाळ्यांत प्रतिज्ञेनें बरा करणाऱ्या गो० डबी ३॥ रुपये.

**मूळव्याधि**—रक्ती किंवा मोडाची असली तरी गोळ्या व मलम यांनीं ताबडतोब बरी होते. १॥ रुपया.

**हिमज्वरावर वस्ताद औ०**—हें हिंवताप व पाळीचे हाडी ताप तीन दिवसांत बरे करितें. ड० १ रु.

**खोकला**—क्षयाशिवाय कोणत्याही प्रकारचा असला तरी समूळ बरा करणारें वस्ताद औषध किंमत १ रुपया.

**दमा**-(श्वासव्याधि)नवा किंवा जुना असो तो त्वरित बरा होतो. ड. किं. १ रु.

**जुलाब होणेस**—अप्रतिम गोळ्या ड. ०८ आणे.

**मुलांची आंकडी**—हटकून बरी करणारें वस्ताद औषध १ रु.

**गुलाब, हिना, केवडा**—इ० उत्तम सुगंधी अत्तरें १ तोळ्यास १॥। रुपये व केंसांस लावण्याचीं उंची सुगंधी तेलें ६ तोळ्यांस १ रु० दरानें मिळतील. कस्तुरीच्या सुरेख कातगोळ्या व तमाखूचे अर्काच्या कस्तूरीमिश्रित गोळ्या २ तोळ्यांचे डबीस १२ आणे प्रमाणें देऊं.

# स्वर्णधात्री तैल,

बदाम, चारोळ्या, कंकोळ, एला इ० पदार्थ, बहुविध वनस्पतींचीं सत्वें व अर्क यांपासून हें तैल मोठ्या परिश्रमांनीं बनविलें असून तें सुगंधी व शांतताकारक आहे. असें अनुभव येतांच समजेल. याच्या मर्दनानें अपस्मार, उन्माद, शूळ इ० रोगांस त्वरित आराम होतो. बा. १। रु०

**कृष्णशास्त्री चिवलकर वैद्य,**

**पत्ता-मु० आंजर्ले, ता० दापोली, जि० रत्नागिरी.**

# अवश्य वाचा !!!

आमची प्रसिद्ध निळी--काळी किंवा लाल शाई एका वर्षांत ८१२ आण्यांची मागविणारास भरपूर माहितीची किंमत ८४ ची डायरी बक्षीस पाठवूं. शाईचे व्यापारीभाव १०० पुडीस ८१०. आणे २५० पुडीस १। रु० ५०० पुडीस २ रु० १००० पुडीस ३॥ रु० ट. ख. निराळा. शिवाय आमचेकडे सर्व तऱ्हेचीं पुस्तकें, नाटकें, ग्रंथ वगैरे मिळतात. रोखीनें अगर व्ही. पी. नें मागणी करावी.

पत्ता—सखाराम सिताराम जोशी

बुधवारपेठ पुणें सिटी.

---

EASTABLISHED 1880.

**INDIA'S HEAD QUARTERS**

For

WATCHES, CLOCKS, TIMEPIECES &c.

Snppliers to

Government, States, Railways &c.

जगप्रसिद्ध व लोकप्रिय अशा मेकरचीं सर्व प्रकारचीं लहानमोठ्या आकाराचीं टिकाऊ दिखाऊ व बरोबर वेळ दाखविणारीं

**वाचेस, क्लाक्स, व टाईमपीसेस.**

विशेष माहितीकरितां इंग्रजी क्याटलाग पहा.

जी. बी. नाईक आणि कंपनी

सिताराम—बिल्डिंग, मुंबई.

# रबरी शिक्के.



सर्व तऱ्हेचे रबरी शिक्के कानडी, मराठी व इंग्रजी अक्षरांत माफक दरानें करून देण्यांत येतील. विशेष माहिती समक्ष अगर पत्रद्वारें.

म्यानेजर—शंकर माधव परुळेकर,

'समाचार बुकडिपो' बेळगांव.

---

# धी गुजरात कंपनी.

## रायपूर अमदाबाद.

**ग्यारंटी** पक्क्या रंगाची

**ईनाम**——रंग वीटला असें दाखविल्यास.

अमदाबादी पक्या रंगाचीं लुगडीं, खण, उपरणी, धोतरजोडे, पीतांबर, किं० मालाबद्दल -॥- आण्याचें तिकीट पाठवून क्याटलॉग मागवा.

श्रीरामेश्वर प्रसन्न.

गुण न आल्यास पैसे परत.

थोड्या किमतींत कायमचा फायदा करून घ्या.

हजारों लोकांनीं अनुभव घेतलेला

# अद्भुत ताईत.

एका महान् तपस्वी ऋषीकडून आह्मीं अत्यंत परिश्रमानें साध्य करून घेतला आहे. हा जवळ ठेविल्यानें असाध्य रोग, पिशाच्चबाधा, बालग्रह, स्वप्नावस्था, वगैरे हरएक प्रकारचे दुष्ट रोग त्वरित बरे होतात व पुन्हां होणे-ची भीति रहात नाहीं. शिवाय हरएक प्रकारचे उद्योगधंद्यास यश येईल. तर सर्व लोकांना याचा लाभ मिळावा या हेतूनें याची किंमत अगदींच कमी ठेवि-ली आहे. कुटुंबवत्सलांनीं अवश्य संग्रहीं ठेवावा. विद्यार्थी, व्यापारी, धंदे-वाले वगैरे सर्व लोकांना पुष्कळ फायदा होईल. तर अशी अमूल्य संधी कोणींही दवडूं नये अशी विनंती आहे. किं. ११ रु. चांदिचा किं. १॥ रु. सोन्याचा किं. ५ रु. एकदम चार घेणारास एक फुकट. पो. ख. वे. अनुपान सोबत.

मिळणेचा पत्ताः—**शंकर दीक्षित अथणीकर,**

कृष्णेश्वराचे देवळाजवळ, मु० पो० मिरज जि० बेळगांव.

---

**सूचना**—हल्लीं वर्तमानपत्रांतील जाहिराती पाहून बहुतेक लोकांच्या मनाचा परिणाम असा झाला कीं, भपकेदार जाहिराती असतात. ही त्यांची समजूत चुकीची नव्हे, परंतु खरा धंदा नाहीं असें मात्र नाहीं. आमची प्रशंसा आह्मीच करीत नाहीं. एकवेळ अनुभव घेऊन खात्री करून घ्यावी. आमचा धंदा लबाडीचा नसून केवळ गरीब लोकांना खरा उपाय कोणी कळ-वीत नाहीं, त्यामुळें गरीब लोकांची नुकसानी होते. म्हणून थोड्या किमतींत गरिबांचा फायदा व्हावा ह्मणून आह्मीं प्रसिद्ध करीत आहोंत. खरेपणाबद्दल पुष्कळ सरटिफिकेट मिळाल्या आहेत. परंतु स्थलसंकोचामुळें एकच लोकांना पाहणेसाठी खालीं देत आहोंत तें पहावें.

वे. रा. रा. शंकर दीक्षित अथणीकर मु. मिरज यांसी कृ. सा. वि. वि. मी जि-तका निराश झालों होतों तितक्या उत्सुकतेनें मी आपल्यास कळवीत आहें. मी आपलेकडून ता. ४।६।१० रोजीं ताईत मागविला होता. परंतु ८ च दिवसांत मला १२ आणे गूण वाटूं लागला. अतां माझ्या मित्रानें माझी स्थिति पाहून फार आश्चर्य केलें. तर माझे मि सा. २ ताईत व्ही. पी. नें पाठवून देणें मी पूर्वी बक्षिस देईन ह्मणून लिहिल्याप्रमाणें ५ रु. मनीआर्डरीनें पाठविले आहेत मी आपले उपकार जन्मपर्यंत विसरणार नाहीं. आपला धंदा केवळ परोपकारी आहे. ईश्वर आपणास असेंच यश देवो. कळावें लोभ वि.

आ. पंडित आणाजी वाडीकर, मु. वंबळवाड.

# आर्यवनौषधालय, मुर्डी.

## धातुवर्धक, अत्यंत कामोत्तेजक व पौष्टिक, वीर्यस्तंभक, रक्तशोधक मनोत्साहकांतिबुद्धिवर्धक सुवर्णमाक्षिक, कस्तुरी मौक्तिक, व अनेक वनस्पतिमिश्र अद्भुत गुटिका.

## मदनामृतसंजीविनी.

शरीरांतील मुख्य राजा जो धातु तो शुद्ध असेल तरच शरीर निरोगी राहून सर्व सौख्य प्राप्त होतें. ती दोषी असेल तर शरीरांत नानाप्रकारचे रोगरूपी शत्रु उत्पन्न होऊन शारीरिक सौख्याचा खरा लाभ मुळींच होणार नाहीं. करितां धातु शुद्ध व पुष्ट होण्यास या गुटिका प्रत्येक वर्षी पाहिजे त्या दिवसांत एकदां तरी अवश्य सेवन केल्यानें शरीर रोगरहित होऊन सर्व सौख्य प्राप्त होतें हें अवश्य लक्षांत ठेवावें. यांच्या सेवनानें नपुंसकत्व, स्वप्नजन्य व इतर धातुपात, उन्हाळे, इंद्रियशिथिलता, कडकी. गर्मीसंबंधीं मुरलेले विकार, मूत्रसंकोच, धातूचा पातळपणा, स्त्रियांची धुपणी, छातींतील रोग, हात-पाय, मूत्रमार्ग व नेत्र यांचा दाह, क्षय, पंडुरोग, मुलांची खर, जीर्णज्वर, अग्निमांद्य, मस्तकशूल, मूळव्याधी, वातरोग, निद्रानाश, पित्तविकार, बाळंतरोग, मधुमेह, जुनाट परमा, मुष्टिमैथुनानें आलेली कृशता, इत्यादि अनेक विकार खात्रीनें बरे होऊन शरीर निरोगी, मजबूत व सतेज बनतें पचनशक्ति व स्मरणशक्ति वाढून धातु व रक्त यांची शुद्धि, वृद्धि, वीर्यस्तंभन व भरपूर कामोद्दीपन होतें. व मनास उत्साह देतात. दूध व जडान्न भरपूर पचूं लागतें. यांत उपयुक्त वनस्पतींचें मिश्रण केलें असल्यामुळें यांत अपायकारक पदार्थ अगदीं नसून वरील विकारांवर अत्यंत गुणकारक आहेत; करितां गुणाबद्दल असंख्य सर्टिफिकिटा मिळाल्या व नित्य मिळतात. पथ्यसेवनाची मुळींच गरज नसून स्त्रिया, पुरुष व मुलें यांस पाहिजे त्या दिवसांत घेण्यास अत्यंत उपयोगी आहेत. गुटिका रुपयाचे आंत मिळणार नाहींत. एकदम चार रुपयांवर कितीही घेणारास टपालखर्च माफ आहे. ४ रुपयांचे आंत वेगळा टपालखर्च पांच आणे. ३५ गोळ्यांस १ रुपया. ७५ गो० २ रु० ११५ गो० ३ रु० १६५ गो० ४ रु० २७५ गो० ६ रु० ५५० गोळ्यांस १० रु०

२ अपूर्व नेत्रांजन—यानें वडस, सारा, फुलें, खुपऱ्या, बिंदु, कांच इत्यादि नेत्राचे सर्व विकार त्वरित बरे होऊन दृष्टि तीव्र व थंड राहाते. या रोगास हें अंजन खरें रामबाण आहे. १॥ तोळा बाटलीस १ रुपया.

३ परम्यावर अपूर्व मिश्रण:—कोणताही नवा जुना पर्मा व तज्जन्य दाह, तिडीक, मूत्राची लाली, संकोच, पूयश्राव, इत्यादि विकार पथ्य नसतां सात दिवसांत जातात. तिडिक एका घटकेंत जाते. असें रामबाण औषध कोठेंच मिळत नाहीं. बाटलीची किंमत एक रुपया. मोठ्या बाटलीस २ रुपये.

सर्व मालाचा मोठा क्याटलॉग मागवा, तो फुकट पाठवूं. औषधांत अपायकारक पदार्थ अगदीं नसून पूर्ण खात्रीची असल्याबद्दल असंख्य सर्टिफिकिटें आहेत. याशिवाय मोठमोठे रोगांवर अनेक औषधें, ग्रंथोक्त रसायनें, भस्में, पाक, गुटिका, आंसवें, तेलें व सुगंधी अत्तरें वगैरे माफक दरानें मिळतात. अनुपानखर्डा सोबत. टपालखर्च वेगळा पडेल. रोखीनें किंवा व्ही. पी. नें पाठवूं. प्रकृतिमान कळविल्यास रोगाचें निदान व चिकित्सा कळवूं.

**कृष्णशास्त्री पेंडसे वैद्य,**

**पत्ता:—मु० मुर्डी, पोष्ट हर्णै, जि० रत्नागिरी.**

रोजच्या वापरण्यास "मुकट्याच्याच किमतींत" सुंदर व मजबूत.

# पितांबर ! कद !! कदासारखे मुकटे !!!

गो ( गाईचें चित्र ) पाल ( चित्र गोवारी )

**गोपाल त्रिंबक दांडेकर भागातलाव सुरत यांनीं बनविलेलें हातमागावरील, रेशमी कापड.**

| लांबरुंद हात. | कदासारखे मुकटे. किंमत रुपये. | | कद. किंमत रुपये. | | पितांबर गोमेकांठी किंमत रुपये. | व्ही. पी. खर्च. |
|---|---|---|---|---|---|---|
| | कांठ | बिनकांठ. | कांठ | बिनकांठ. | | |
| ७×१॥। | ५॥ | ४ | ६८१४,७८१४ | | मुकट्याचीच किंमत व मजबूत. | ०– ६–० |
| ८×२ | ६॥ | ५ | | | | ०– ६–० |
| ९×२। | ८॥ | ६॥ | १० | ९ | ९८१४ | ०– ८–० |
| १०×२॥ | ११ | ८॥ | १५ | १२ | ११,१२,१६ | ०–१०–० |
| १६×२। | १३ | मुगी व साधे ११ | | | १५ | ०–१२–० |
| १६×२॥ | ६, १७ | मुगी व साधे १३ | २५ | १८ | १८,२५,३० | ०–१२–० |
| पामरी. ६×२॥ | १६, ८२ | | | | | ०– ६–० |
| ४×१॥। | ३, ५ | | | | | ०– ४–० |

कोटाचें फारच मजबूत रेशमी कापड दर वारास रु० १॥ ते ४॥ दरीयामोजें ( वॉटर सिल्क–पोलकीं व झबल्याकरितां फारच मजेदार, मजबूत रेशमी कापड ) साटीण, फीत, जरीचे कांठ, जीक चळकचे, चोळ्यांचे, कांठ व टोप्या, जरीचे खण, पैठंण्या ( खऱ्या व खोट्या ) मश्रू किनखाव, सोन्या–चांदीचे वर्ख, मोतीं, हिरे, सुरतेची प्रख्यात देशी साखरेची बर्फी, श्रीखंड, होल्डाल (प्रवासी बिछाना ) रु० ८,१० १२, पटके साधे व जरीचे रु० ८, १०, १२, १३.

**दक्षणी, गोपाल त्रिंबक दांडेकर–सुरत,**
**वामन विठ्ठल परांजपे–पुणें, गवत्या मारुतीजवळ.**

**एस्. आर्. गाईकवाड अँन्ड् सन्**
**यांचा**
**१८८८ सालीं स्थापन झालेला**
**सुप्रसिद्ध**

# शाईचा कारखाना.

TRADE MARK.




TRADE MARK.

गेल्या २२ वर्षांचा अनुभव आमच्या शाईच्या गुणांबद्दल व किमतीच्या स्वस्तपणाबद्दल आमच्या गिऱ्हाइकांची खात्री पटवीत आहे. शाईचा खप हिंदुस्थान, बलुचिस्थान, अंदमान बेटें, सिलोन, वगैरे ठिकाणीं जारीनें सुरू असून हजारों शिफारस–पत्रें तिकडून येत आहेत; त्यांतील कांहीं आमच्या कॅटलागमध्यें दिलेलीं आहेत तीं पाहून खात्री होईल. आम्हांकडे निळीकाळी, तांबडी, निळी, हिरवी, व जांभळी या शाई, कागद, पूड, व गोळ्या वगैरे मिळतात. सविस्तर माहिती कॅटलागमध्यें दिलेली आहे. आमची शाई वर्षांतून एक वेळ विकत घेणारास आमचें त्या सालचें सचित्र, रंगित व सुंदर कॅलेंडर फुकट मिळतें. कॅटलाग फुकट!!

एस्. एस्. गाईकवाड
मॅनेजिंग प्रोप्रायटर
**एस्. आर. गायकवाड अँन्ड सन्स्–पुणें.**

# रेलवेचा प्रवास






करीत असततां खिशांत इन्डीपेन्डन्ट पेन असली ह्मणजे वाटेल त्या वेळीं पत्र लिहिण्यास अडचण पडत नाहीं. ह्या पेनांत एक वेळ शाई भरलीं म्हणजे १००० शब्द लिहि-पर्यंत पुन्हा शाईची जरूर लागत नाहीं. आमच्याकडे निरनिराळया किमतीच्या आणि पुष्कळ दिवस टिकणाऱ्या पेना आहेत. नं. १, १२ आणे. नं. २, १४ आणे. नं.३ १ रु. नं. ४, १॥ रु. नं. ५, २ रु. नं. ६, ६ रु. व्ही. पी. खर्च त्याशिवाय.

याखेरीज आपच्या कारखान्यांत तऱ्हतऱ्हेचे रबरस्टँप सर्व धातूवरील मोनोग्राम इ० प्रेक्षणीय कोरीव कामें, तारीख छाप, रबरटाईपाच्या इंग्रजी अक्षरांच्या पेटचा, कपडचावर लिहिण्याची पक्की शाई वगैरे सामान तयार आहे. संपूर्ण माहितीसाठीं अर्धा आण्याचें तिकिट पाठवून आमचा सचित्र कॅटलॉग मागवा.

**पी. पी. रेळे आणि कंपनी.,**

रबरस्टँप–मेकर्स आणि एनग्रेव्हर्स इ०

१७९ काळकादेवी रोड,

मुंबई.